






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य-पत्रिका

वर्ष २५-वें, अंक १०४ ] [ जानेवारी-फेब्रुवारी-मार्च, १९५३

# १०४

## अनुक्रमणिका



संपादक

विष्णु भिकाजी कोलते

संपादक-मंडळ

के. ना. वाटवे — शं. के. कानेटकर

सरोजिनी बाबर — म. ना. अदवंत



# साभार स्वीकार

( ग्रंथनाम, लेखक, प्रकाशक व मूल्य या क्रमाने )

१. मऱ्हाटी संस्कृति (कांही समस्या)— शं. बा. जोशी, आंतरभारती प्रकाशन, १२ टिळक-रस्ता, पुणे २; ५ रु.

२. स्वामी विवेकानंद—त्र्यं. ग. बापट, प्रका. द. र. कोपर्डेकर, ५२९ सदाशिव, पुणें २; १॥ रु.

३. किरणांतील गूढ ( खंडकाव्य )— य. मो. नानल, सुहास पब्लि. हाऊस, अंधेरी ईस्ट; ४ आणे.

४. थोरांच्या माता— प्र. न. जोशी, व्हीनस बुक स्टॉल प्रकाशन, पुणें २; १॥- रु.

५. प्राचीन पुरुषोत्तम— गो. नी. दांडेकर, व्हीनस बुक स्टॉल प्रकाशन; २ रु.

६. कौंतेय ( नाटक )— वि. वा. शिरवाडकर, मराठी प्रकाशन, १२ त्रिभुवन रस्ता, मुंबई ४; १॥ रु.

७. दोन सांचे ( नाटक )— तु. कृ. सरमळकर, मराठी प्रकाशन, १२ त्रिभुवन रस्ता, मुंबई ४; ·॥· आणे.

८. चंद्रप्रकाश ( कविता )— भालचंद्र खांडेकर, कॉंटिनेंटल बुक सर्व्हिस, ६२६ शनिवार, पुणें २; २ रु.

९. सौभद्र ( नाटकाची गोष्ट )— पु. रा. लेले, के. भि. ढवळे, मुंबई २; ·॥· आणे.

१०. बडा नाना आणि छोटा नाना— शं. रा. देवळे, के. भि. ढवळे, ·॥· आणे.

११. प्राणिगांवच्या मौजा—सौ. उषा आपटे, के. भि. ढवळे, मुंबई ४; ·॥· आणे.

१२. वहिणाबाईंचीं गाणीं— कै. बहिणाबाई चौधरी, परचुरे प्रकाशन, गोरेगांवकर चाळ, मुंबई ४; २॥ रु.

१३. वाग्यज्ञ ( लेखसंग्रह )— कृ. पां. कुलकर्णी,परचुरे प्रकाशन, गोरेगांवकर चाळ, मुंबई ४; ३॥ रु.

१४. मराठी माध्यमिक भौतिकी ( भाग १ )— प्रका. नागपूर विश्वविद्यालय, नागपूर १; ६। रु.

१५. पाहुणे ( कादंबरी )— व. शा. वरखेडकर, वीणा प्रकाशन, नागपूर १; ३ रु.

१६. मोहोर ( कथा )— लक्ष्मणराव सरदेसाई, ताडदेव बुकडेपो, मुंबई ७; ३ रु.

१७. मराठी सुनीत— संपा. वि. म. कुलकर्णी–मा. ग. बुद्धिसागर, चित्रशाळा प्रकाशन, पुणें २; २॥ रु.

१८. कमळवेल ( कविता )— वि. म. कुलकर्णी, चित्रशाळा प्रकाशन, पुणें २; १॥ रु.

१९. चंद्रावर स्वारी (शास्त्रीय कादंबरी)— भा. रा. भागवत, लाखाणी बुकडेपो, मुंबई ४; २ रु.

२०. सुखाच्या शोधांत ( गद्यकाव्य )— मधुकर घोलप, सौ. मंगला घोलप, २३१ रास्ता, पुणें २.

२१. वैदिक संस्कृतिविरोधी लाल गुंडगिरी— वि. के. पाळेकर तथा अप्रबुद्ध, कॉंग्रेसनगर, नागपूर १; ·॥· आणे.

२२. कला आणि कलास्वाद— श्री. दा. भालेराव, प्रतिभा प्रकाशन, मुंबई २८;८६.

२३. राज्यशास्त्र— व. म. सिरसीकर, –स. मा. गर्गे, सुधा सिरसीकर, १९७-३-४ सदाशिव, पुणें २; ८ रु.

२४. विज्ञानकथा ( भाग १ ते ३ )— प्र. न. जोशी, आनंद कार्यालय प्रकाशन, सदाशिव, पुणें २; १।, १।= व १॥=

२५. मराठी शब्दरत्नाकर ( तिसरी आवृत्ति )— संपा. कै. वा. गो. आपटे व गोपीनाथ तळवलकर, आनंद कार्यालय प्रकाशन, सदाशिव, पुणें २; १२ रु.

२६. प्रेमिकांना आहेर— ले. व प्रका. श्री. म. माटे, नातूबाग, पुणें २; २॥ रु.

२७. मातृभाषेचें अध्यापन— चंद्रकुमार डांगे, चित्रशाळा प्रकाशन,पुणें २; ४ रु.

२८. कांहीं पावलें— (रोजनिशी) दादासाहेब मावळंकर, महाराष्ट्र ग्रंथभांडार, कोल्हापूर; ३ रु.

---

मुद्रकः— म. ना चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, लि०, १९८।१७. सदाशिव, पुणें २.
प्रकाशकः— अ. गं. मंगरूळकर, चिटणीस, महाराष्ट्र-साहित्य-परिषद्, टिळक-रस्ता, पुणें २.

महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य-पत्रिका

वर्ष २५-वें, अंक १०४ ] [ जानेवारी-फेब्रुआरी-मार्च, १९५३

## १०४

## अभंग-कूजन !—

— १ —

विकट हासूनी काळ ओरडला
 ' खुळ्यांनो, तुम्हांला भान नाही
हजारों हजार वर्षांपाठीमागे,
 तुम्हां जावें लागे खुणेसाठी
कोण होतां तुम्ही ? पटली ओळख ?
 आता कां रे मुख चुकवितां ?
हजारों हजार वर्षे लोटतील,
 प्राप्त ती होईल गती पुन्हा
नका वाहूं व्यर्थ संस्कृतीचा गर्व,
 हारवीन सर्व क्षणमात्रें '-

— २ —

मुख मागे पण पुढे तूं चालशी,
 रीत तुझी अशी उफराटी
सरळ का तुझें पडतें पाऊल !
 तुझी वाटचाल नाही सुधी
तुझी कुरकूर पाउलागणिक,
 नेहमी साशंक मुद्रा तुझी
मागीलांसंबंधी प्रशंसा अक्षयी
 पुढीलांविषयी पूर्वग्रहु
पुढे पुढे तरी चालत असशी,
 असा तूं प्रवासी विक्षिप्त रे !

— ३ —

पशूंचें एकदा भरें सम्मेलन,
 होतें निमंत्रण मानवाला
" दुबळा, भेकड, क्षुद्र कोणी प्राणी ! "
 करी हेटाळणी जो तो त्याची
" ऐका हो, " बोलला अध्यक्ष केसरि,
 " जाहीर मी करी बक्षीस हें
क्रूर हिंसाकर्मी उच्चांक गाठील,
 पात्र तो होईल बक्षिसाला "
मानवाचा आला पहिला नंबर,
 लाजले इतर पशु हिंस्र !

— ४ —

न कळे काय हें, शांततेचा अर्थ
 लाविती समर्थ जगांतले !
विश्वबंधुत्वाची करिती घोषणा,
 न कळे कल्पना काय त्यांची !
दुबळ्यांच्या माथां ठेवूनीया हस्त,
 म्हणती हे, ' स्वस्थ बसा आता ! '
पिंजऱ्याचें दार करूनिया बंद,
 म्हणती हे, ' नांदा सौख्यभरें ! '
बोलती सर्वांचें कराया रक्षण,
 लढतो भीषण महायुद्ध !

— गणेश हरी पाटील

## “ येतिल कधि मज पङ्ख !—”

येतिल कधि मज पङ्ख ?
उडाया, येतिल कधि मज पङ्ख ?
या आळ्यांसह मी सरपटतों
भुईतळीं केवळ फरपटतों
खितपत खाली वळवळ करतों
जेथे पडला पङ्क !
हें माझें जग, वीतभराचें !
घरकुल माझें चिमुटभराचें
क्षितिज गोठतें मूठभराचें
त्यांत कीट मी रङ्क !
अहा ! वरी मोकाट हो खुलें
खुल्यावरी नक्षत्र हें खुलें !
तिथे खोलुनी पंख आपले
गरुड फिरे निरशङ्क !
तयासवें मम अन्तर उडतां
येई ना मज भुई सोडतां,
चाटित पडलों धूळचि नुसता
हा खुपतो आतङ्क
अफाट दर्शन मजला व्हावें—
जें मर्यादेंत न सामावें !
हृदय भरुन एकदा पहावें—
जीवन खुलें विटङ्क !—
जें चौभिन्तींपैल निरुन्द—
देत फेकुनी छोटे बन्ध—
चहुंकडेच खेळे स्वच्छन्द—
चारुतेंत अकलंक !
नव आशांच्या कळ्या उमलती
नव्या दिशांचीं तोण्डें खुलतीं
नवा किरण हा चढतो वरतीं—
सेविन त्याचा अङ्क !
तिथे हवेवर तरल तराया
नीलिमेंत मनभर डुम्बाया
जलदांचे अञ्चल चुम्बाया
हवे हवेचे पंङ्ख !
येतिल कधि मज पङ्ख ?

—रा. अ. काळेले,

---

## अरुन्द मळकट - पाउलवाट—

अरुन्द मळकट पाउलवाट
संध्या छाया
काजळ राया
अन् माथ्यावर अवघड घाट—
खोल कपारी
वासली दरी
भवतीं पसरे माळ अफाट—
कांटेरी बन
फत्तर भीषण
गवत माजलें हें मोकाट—
मूकचि सारे
मूकचि वारे
मात्र झरा हा करि गोंगाट—
निळ्या साउल्या
पसरुं लागल्या
लांबट भीषण अपुले हात—
रात किरकिरे
परतलीं गुरें
दूर कुणाची येई साद—?
अजुनि चालणें ?
कुठवर जाणें ?
इथे कुणाची मिळेल साथ ?—
चाल पुढे रे !
चाल चाल रे !
काट प्रवाश्या अन्तर काट—!
अरुन्द मळकट पाउलवाट—

—प्रतिभा काळेले

## प्रिय मित्र ? ( लघुनिबंध ) : : शांताराम

परवां मी एक पत्र लिहायला बसलों आणि सुरवातीच्या मायन्याशींच घुटमळलों. 'प्रिय मित्र' असा मायना मीं लिहिला आणि तो खोडून टाकायचा विचार माझ्या मनांत जोरानं उसळून आला. मी स्वतःलाच विचारूं लागलों की, ज्या सज्जनाला मी पत्र लिहिणार आहे तो मला प्रिय आहे का ? त्या प्रश्नाचं उत्तर मला तात्कडतोब मिळालं की, त्याच्या माझ्या संबंधाला काय वाटेल तें म्हणतां येईल; पण 'मित्र' मात्र म्हणतां येणार नाही. लगेच दुसरा प्रश्न मीं विचारांत घेतला. तो माझा मित्र तरी आहे का ? त्या प्रश्नाचं प्रामाणिक उत्तर मला सापडेना. उलट मित्र या कल्पनेभोवतीं जमा झालेल्या माझ्या अनेक समजुती आणि आठवणी माझ्या डोक्यांत गर्दी करूं लागल्या. माझं डोकं थोडा वेळ अजिबात गोंधळून गेलं.

लहानपणीं शिकण्यांत आलेला एक इंग्रजी धडा मला आठवला. कांही प्रश्न आणि त्यांचीं उत्तरं, अशा पद्धतीचा तो धडा होता. शिक्षकांनी प्रश्न मोठ्यानं विचारायचा आणि आम्हीं मुलांनी मिळून उत्तर द्यायचं, अशा तऱ्हेनं तो धडा आम्हांला शिकवण्यांत आला होता. "तुमचा सर्वांत प्रिय मित्र कोण ?" या प्रश्नाला आम्हीं उत्तर द्यायचं "माझे वडील." इंग्रजी समाजांत काय परिस्थिति असेल ती असो पण आमच्या समाजांत मात्र त्यावेळीं वडिलांना चारचौघांत मोकळ्या आवाजांत " बाबा " अशी हाक मारायची पूर्ण मुभा नव्हती; वडील मात्र मुलाला "बाबा" अशी हाक मारीत असत.

कंठगत झालेला तो इंग्रजी धडा आमच्या व्यक्तित्वांत कुठवर मुरला हें सांगतां येत नाही, पण पुढे इतिहास वाचतांना मात्र मला त्याची एकदा अतिशय तीव्र आठवण झाली. मी जेव्हा मोंगलांचा इतिहास वाचूं लागलों आणि बाप-लेकांमधील त्यांच्या संबंधाचीं शहारे आणणारीं वर्णनें वाचलीं तेव्हा मला वाटलें की तो धडा त्यावेळच्या साहेबांनी मोंगलांना शिकवायला हवा होता. नाही तरी पाश्चिमात्य औषधं, पाश्चिमात्य कापड इत्यादींचे नजराणे मोंगलांना द्यावयाचा उपक्रम निरनिराळ्या साहेबांनी सुरू केला होता व तो धडा जर त्यांनी मोंगलांना शिकवला असता तर...पण जाऊं द्या. इतिहास घडला तो घडून गेला. जर-तरचे टाके घालून तो शिवतां थोडाच येणार आहे ?

पिता-पुत्राचे संबंध मित्रासारखे असावेत-विशेषतः मुलगा वयांत आल्यावर तर ते असावेतच-ही शिकवण आपल्याकडेहि होती.पण ती एकतर्फी असावी. निदान ज्या स्वरूपांत मित्र या शब्दाचं दर्शन आम्हांला इंग्रजी शिक्षणामुळे झालं त्यांत कांही तरी नावीन्य खचितच असलं पाहिजे. नाही तर त्यावेळीं फार लोकप्रिय असलेली नेहरू पितापुत्रांची एक कथा आम्हीं मिटक्या मारीत कां ऐकली असती ? पंडित मोतीलाल नेहरू जवाहरलाल नेहरूंना सिगरेट की कांही तरी स्वतः आपल्या हातांनी देतात ही मोठ्यांची छोटी गोष्ट त्यावेळीं फार लोकप्रिय होती. या प्रकारांतलं नावीन्य आम्हा लोकांना त्यावेळीं फारच आवडूं लागलं होतं यांत शंका नाही. बाप आणि मुलगा या दोघांनाहि विडीचं व्यसन असलं तरी दोघांनीहि तें चूपचाप उरकावं-मुलानं तरी तें गुपचूपच केलं पाहिजे असा आमचा मूळचा पिंड कोणीकडे आणि ' आंधळ्याची शाळा ' या नाटकांतील अण्णासाहेब आपला मुलगा कुमार याला "दूं ओढतोस का ?" असं म्हणतात तो कलमी प्रसंग कोणीकडे !

अनुक्रमणिका

पितापुत्रांच्या मैत्रीचे हे फिरंगी देखावे सोडून दिले तरी एका विशिष्ट वयानंतर त्या दोघांत मित्रत्वाचे संबंध पूर्वींहि असत याविषयी मात्र शंका नाही. तसे संबंध नसते तर व्हायचं कसं? व्हायचं एकच; आणि तें म्हणजे मोंगलाई. ही मोंगलाई टाळण्यासाठी बाप-लेकांनी दोस्तांसारखं वागावं हेंच हिताचं आणि आनंदाचं. एका विशिष्ट गरजेसाठीच पिता-पुत्रांत मैत्रीचा पाया असतो. सर्वच मैत्रीचा उगम गरजेपोटीं असतो असं जर मी म्हणालों तर तें ऐकायला कससंच वाटेल, पण असतं तसंच; आणि कानाला तें कससंच वाटतं याचं कारण आपले संस्कार. लहानपणीं ऐकलेल्या गोष्टी, वाचलेल्या कथा आणि वास्तवतेचा स्पर्शहि न झालेल्या कल्पना इत्यादींचा आपल्या मनांत असा संकर होतो की पुढे कुणी खरं बोललं तरी तें आपल्याला ऐकवत नाही; निदान माझं तरी मन खरं बोलतांना आणि ऐकतांना अस्वस्थ होतं. पण मनाची अस्वस्थता काबूंत ठेवून बोलायचं तर असंच म्हणावं लागेल की गरज हीच मैत्रीची जननी आहे. जिच्या मुळाशीं मतलब नाही अशी मैत्री म्हणजे प्रौढतेला पडलेलं एक बाळपणचं स्वप्न आहे. अशी निर्व्याज मैत्री म्हणजे अनुभवाला मधूनमधून होणारी आपल्या कोवळेपणाची आठवण.

मैत्रींत मतलब असतो असं म्हणतांना, मैत्री व प्रीति या दोन अवस्थांतील साम्य मी विसरलों नाहीं. स्त्री-पुरुषांच्या बाबतींत तर मैत्री कोणती आणि प्रीति कोणती हें ठरवणं देखील एक सूक्ष्म कार्य आहे याची जाणीव मला आहे. कथा–कादंबऱ्यांतील परिचय, मैत्री आणि प्रेम या पायऱ्यांचं मला थोडंसं प्रत्यक्ष ज्ञान आहे. तरीहि एक सत्य सांगतांना मला मुळीच संकोच वाटत नाही. प्रीति काय किंवा मैत्री काय दोन्ही अवस्थांचा जन्म गरजेंतून झाला आहे. माणूस प्रेम करतो किंवा मैत्री करतो ती मतलबासाठी, गरजेसाठी. उगीच कोणी प्रेम कशाला करील? उगीच कोणी मैत्री कशाला करील?

मतलब म्हटला की आजकाल पैशाची हटकून आठवण होते. गरजेला कामीं येणारा तो मित्र या व्याख्येचा अर्थ आम्हाला पैशाच्या उधारीबाबत चटकन् आठवतो. पैशाची गरज भागवणारा तो मित्र हा अर्थ कुणालाहि पटेल इतका तो अनुभवसिद्ध झाला आहे. उधारी आणि मैत्री हे शब्द समानार्थक असावेत असं मला पुष्कळदा वाटतं. या उधारीच्या व्यव-हारानं मित्रमंडळींत काय काय चमत्कार घडवून आणले आहेत हें सगळ्यांना माहीत आहे. म्हणूनच त्यांची पुनरुक्ति करण्यांत अर्थ नाही. उधारीमुळे मैत्रीला एक विलक्षण विनोदी, एक विलक्षण करुण रूप आलं आहे यांत मात्र शंका नाही. मित्राला पैसे उधार देतांना माणसानं एक तर पैसे गमवायला, नाही तर मैत्री गमवायला तरी तयार असावं, असा धडा अनुभव सगळ्यांनाच शिकवतो. कधी कधी तर पैसेहि जातात आणि मैत्रीहि जाते. मला वाटतं या बाबतींत शहाण्या माणसानं असं समजावं की मित्र–संबंधांत उधारी म्हणजे पूर्व-जन्मीचं एक ऋण आहे. पण केवळ पैशाच्या गरजेंतूनच मैत्री उत्पन्न होते किंवा तुटते असं मात्र नाही. मैत्री आणि प्रीति यांचं साम्य मला मान्य आहे, त्याचं कारण हेंच की प्रीति-सारखीच मैत्रीहि एखाद्या शारीरिक वा मानसिक गरजेंतून उत्पन्न होत असते. या शारीरिक वा मानसिक गरजेचं स्वरूप पैशाच्या गरजेइतकं स्थूल नसतं हें मात्र खरं. पण प्रेमाप्रमाणेच तीहि एक गरज आहे. शाळा कॉलेजांत असतांना ज्यांच्याशिवाय एक क्षणहि घालविणं कठीण जात असे पण आज जे माझ्या किंवा मी ज्यांच्या लेखीं नाही असे किती तरी माझे मित्र मला आठवतात. त्यांच्याशीं माझं भांडण झालं नाही; गैरसमज झाला नाही; कित्येकांशीं मी

अंतराने पांगलों नाहीं. पांगलों तो मनाने. आमची एकमेकांविषयी गरज संपली हेंच खरं. मला एकट्यालाच असा अनुभव आला नसावा. अशा वेळीं उरते केवळ आठवण.

जुन्या मित्रांची आठवण मला कधी कधी अस्वस्थ करते. माझ्याहि आठवणींनी ते अस्वस्थ होत असावेत. या अस्वस्थतेचं मुख्य कारण म्हणजे मित्र या शब्दाचा आमच्या मनावर झालेला संस्कार. तो संस्कार स्वप्नासारखा सुंदर, ध्येयासारखा उदात्त असला तरी जीवनासारखा खरा नाही, टिकणारा नाही. मनांत कुरकुरणारा मात्र तो आहे. अशी त्राधिक कुरकूर टाळण्यासाठी मित्र आणि मैत्रीच्या कल्पना स्पष्ट कराव्या आणि पटकन घ्याव्या असं मला पुष्कळदा वाटतं. मित्र या नामाची व्याप्ति कमी करायला प्रिय हें विशेषण फारसं उपयोगी ठरत नाही. फार घासल्यामुळे दोन्ही शब्द झिजून गेले आहेत. मित्र या शब्दांतील भावना रिकामी झाली असून तिची जागा उपचारानं घेतली आहे. 'मित्र हो' अशी हाक व्याख्यानाच्या सुरवातीला एखाद्या वक्त्यानं दिली असतां त्या हाकेंत सामान्यत: जेवढा ओलावा राहील तेवढीच मैत्री आतां मित्र या शब्दांत उरली आहे. मित्र कोण आणि परिचित कोण हें नीट कळेनासं झालं आहे. आपल्या मनांतल्या भावना नीट व्यक्त करण्यासाठी मित्रांची वर्गवारी करावी असा विचार पुष्कळदा माझ्या मनांत येतो. 'प्रिय-मित्र' या संबोधनाऐवजी साहित्यिक-मित्र, चहा-मित्र, क्रीडा-मित्र, भोजन-मित्र [ भोजनभाऊ हा शब्द चांगला असला तरी तो बदनाम झाला आहे.] इत्यादि शब्द जर आपण वापरूं लागलों तर पहिल्यांदा कसंसंच वाटेल! पण त्यामुळे भावनांची कुचंबणा टळेल, मित्र या शब्दानं होणारा अपेक्षाभंग टळेल. कोणाकडून काय अपेक्षिलं पाहिजे हें कळलं नाही तर पुष्कळदा फार गोंधळ उडतो. आपला भोजन-मित्र आपल्या जेवणाच्या वेळीं येईल, तो आपल्या बरोबर जेवेल, आपल्याला भोजनहि तो देईल, पण त्यानं आपल्यासाठी जीव कां द्यावा? मैत्रीच्या ज्या अनेक कथा शाळांतून शिकवण्यांत येतात, त्या कथांतल्या मित्रांना एकमेकासाठी जीव देणं म्हणजे अगदी हातचा मळ वाटतो. असे मित्र कथांतून व इतिहासांतूनच सापडायचे. धन्य त्या कथा, धन्य तो इतिहास, धन्य ते मित्र! असे लोकोत्तर मित्र मिळाले तर नकोत कुणाला? पण शब्दांचं मोहोळ उठवून त्यांत जर भावनेचा मधु मिळाला नाही तर या आटापिटीला अर्थ राहत नाही.

अप्रिय माणसाला प्रिय म्हणण्याचा, अमित्राला मित्र म्हणण्याचा प्रसंग माझ्यावर येतो तसाच इतरांवरहि अनेकदा येत असला पाहिजे. 'प्रिय मित्र' असं मला संबोधणाऱ्या कांही लोकांवर असा प्रसंग येत असेल. अप्रिय व्यक्तीला प्रिय म्हणायचं तर खरोखरच प्रिय असणाऱ्या व्यक्तीला काय म्हणायचं? प्रिय नसलेल्या व्यक्तीला प्रिय म्हणायचं तर खरोखरच प्रिय असणाऱ्या व्यक्तीला अधिकप्रिय म्हणायचं की काय? असे प्रश्न पुष्कळांच्या मनांत पुष्कळदा येत असतील. त्यांत एक गंमत अशी की आपल्या प्रियेला आपण 'प्रिये' अशी हाक सहसा देत नाही; प्रियकराला 'हे प्रियकरा' असं बहुधा म्हणत नाहीं. असले प्रसंग आपण केवळ नाटकांत करतों. नाटकांत तें चालतं! कारण नाटकांतल्या प्रियकराला आपल्या प्रेमाचा प्रेक्षकांत बोभाटा करावयाचा असतो. प्रत्यक्षांत आपण असं केलं तर प्रसन्न होण्याऐवजी आपली प्रिया रागावेल. प्रत्यक्षांत प्रेम व्यक्त करण्याची खूण उलटी आहे. प्रत्यक्षांत प्रेम संबोधनांतून वाहत नाही. अबोलांत तरी तें व्यक्त होतं किंवा थेट उलट्या प्रकारानं तें प्रगट होतं. जिवश्चकंठश्च मित्र पुष्कळ दिवसांनी भेटले किंवा एकमेकांना लिहूं लागले तर प्रेमासाठी एकमेकांना भरपूर शिव्या देतात. एकमेकांना अतिशय प्रिय असणाऱ्या व्यक्तींचं अतिशय

प्रेमांतलं वागणं बोलणं तिऱ्हाइतानं बघितलं तर त्याला प्रश्न पडेल की हे लोक प्रेम करताहेत की भांडताहेत. प्रेमाची किंवा मैत्रीची ही अशी उलटी खूण आहे. एरवी व्यवहाराच्या सरळतेनं वागायचं म्हणजे नुसते उपचार म्हणून शब्द वापरायचे; त्यांत भावना असो किंवा नसो.

माझ्यासारखे अनुभव ज्यांना आले किंवा माझ्यासारखे ज्यांचे विचार आहेत ते शेवटीं उपचार कां पाळतात ? दांभिकपणा म्हणून नव्हे. ते शेवटीं विचार करतात 'वचने किं दरिद्रता ?' कृतींत दारिद्र्य असलं तर असो, वाणींत तरी औदार्य कां नको ? औदार्याशिवाय उपचारांचा आणखी एक फायदा आहे. मित्र नसलेल्या व्यक्तीला मित्र म्हटल्यानं मैत्री जडत नाही हें तर खरंच ! पण त्याहून अधिक खरं हें की मित्र नसलेल्या माणसाला मित्र म्हटलं नाही तर तो आपला शत्रु होण्याचा फार संभव असतो. कोणत्याच व्यक्तीला शत्रुत्व परवडत नाही. एकमेकांवर अवलंबून राहण्यांतच सामाजिक जीवन आहे हें त्याला माहीत असतं. म्हणूनच तो मित्र नसलेल्या व्यक्तीला प्रिय मित्र असं म्हणतो. त्याला म्हणायचं असतं "बाबा रे, मित्र नसशील पण निदान शत्रु तरी होऊं नकोस."

'प्रिय मित्र' या मायन्याशीं मी थोडासा अडखळलों खरा, थोडासा गोंधळलों खरा, थोडासा अस्वस्थ झालों खरा; हा गोंधळ शांत होतांच मात्र मी तो मायना तसाच राहूं दिला; नव्हे पुन्हा एकदा गिरवून काढला.

---

## उदयोन्मुख कविमित्रांस ! (कणिका)

मित्रहो ! कशाला उपद्व्याप हा करतां ?
कां वृथा सजवितां शब्द-लक्तरीं कविता ?
दारिद्र्य अशानें अधिकच उघडें पडतें
— नव कविता म्हणुनी शिरीं चढविता इजला
— हे नाक मुरडती रसिक पाहुनी तिजला
माजले संप्रती कवितेच्या मंदिरीं
नास्तीक पुजारी, दृष्टि प्रसादावरी
कशि प्रसन्न होइल यांच्यावरि देवता ?
— हे बोलुं लागले खुशाल अद्वातद्वा
— विधिनिषेध न यांना; कुणि निंदा की वंदा !
उदयोन्मुख मित्रा ! सावधान बा, होसी
हे भुरळ घालुनी, पाडतिल तुज फशी
साक्षात् 'मुक्त' हे धुंदच, माथेफिरू
— हे 'विवस्त्र' फिरण्या सज्ज झुगारून लज्जा !
— संप्रदाय यांचा नग्न; दूर पळ, तूं जा !

— गोविन्द झोकरकर

---

[अनुक्रमणिका](#)

# केशवसुतांच्या कवितेंतील निराशा : भवानीशंकर श्रीधर पंडित

( मागील अंकावरून पुढे चालू )

—५—

चिर-सुंदर व चिर-तरुण निसर्ग, दूरावलेलें बाल्य आणि कल्पनेंतला स्वर्ग यांपासून निर्माण होणाऱ्या केशवसुतांच्या कवितेंतील नैराश्याचें स्वरूप त्यांच्या ' कोणीकडून गऽ कोणीकडे ' व 'हरपलें श्रेय' या तात्त्विक कवितांपासून निर्माण होणाऱ्या नैराश्यापेक्षा निराळें आहे. काल्पनिक नैराश्यांत केवळ रम्य हुरहूर आहे. पण तात्त्विक नैराश्यांत उत्कट तळमळ आहे. केशवसुतांनी आपल्याकडील संत–साहित्याचा फारसा परिचय–परामर्श करून घेतला नव्हता. फारसा म्हणण्याचें कारण असें की, ' तत्त्वतः बघतां नामा वेगळा ', ' तुझें नाम मुखीं ', किंवा ' सतारीचे बोल ' अशा कांही कांही कवितांवरून त्यांची 'ग्यानबा तुकोबां'च्या वाङ्मयाशीं थोडीफार तोंडओळख असावी असें वाटतें. ' हरपलें श्रेया ' मधील कल्पना तर त्यांना उघडउघड वर्ड्स्वर्थ व एमर्सन यांच्याकडून स्फुरली आहे. एमर्सनने उपनिषदें-वेदादि पौरस्त्य साहित्याचा आस्वाद भाषांतरांच्या माध्यमाने घेतला होता. वर्ड्स्वर्थनेहि आपल्या Ode मध्ये पुनर्जन्माच्या पौरस्त्य कल्पनेचा उपयोग केला आहे. तिच्या संबंधीं एक टीकाकार लिहितो—

'But we are to remember that the poet never asserts as a fact that he believes in a past existence. The idea is a very old one and is a feature of some religions, such as Buddhism, and the poet suggests it for a poetic purpose.'

केशवसुतांनी आपल्या तत्त्वज्ञानाचा अथवा संत–साहित्याचा प्रत्यक्ष आस्वाद घेतला असता, तर त्यांच्या ' आत्मिक तळमळी 'ची परिणति शांतींत व तुष्टींत झाली असती. ' सतारीच्या बोलां 'त ' जड तें खोटें हें मात्र कसें, तें न कळे; मज जडलेंच पिसें, काय करावें, कोठें जावें, तुमचें मजला कीं विष खावें ! '—अशी त्यांची स्थिति झाली खरी, परंतु ' अखिल भेदां ' चा विसर पडतांच म्हणजेच ' अद्वया ' चा प्रत्यय येतांच ' शांतच हृदयीं झालें सारें ' असा तिचा समाधानाचा शेवट झाला.

बाल्य व स्वर्ग या कल्पनांच्या जोडीलाच केशवसुतांच्या काव्यांत ' वेडेपणाची एक चमत्कारिक कल्पना जागजागीं दृष्टीस पडते. या विलक्षण कल्पनेचें मूळहि त्यांच्या इंग्रजी वाङ्मयाच्या परिशीलनांत असावें. Poets are mad आणि Poets are born; they are not made हीं इंग्रजी वचनें सर्वश्रुत आहेतच. याच वचनांच्या जोडीला The true poem is the poet's mind या एमर्सनच्या सिद्धांताचा केशवसुतांच्या मनावर पगडा बसला असावा असें वाटतें. एमर्सनच्या Poetry आणि Imagination या निबंधांतील काव्यविषयक विचार केशवसुतांनी चांगलेच आत्मसात् केले होते. ' Great wits to madness nearly are allied. Both serve to make our poverty our pride. ' किंवा ॲरिस्टॉटल-प्रणीत ' No great genius was, ever without some mixture of madness, nor can anything grand or superior to the voice of common mortals be spoken except by the agitated soul ' आदि विचार त्यांना एमर्सनकडून प्राप्त झाले होते.

अनुक्रमणिका

काव्याचा आस्वाद व आनंद कळावयाचा असेल तर 'थोडे वेडे व्हा वेडे' असें केशवसुतांचे मित्र कै. प्रि. वा. ब. पटवर्धन यांनीहि मनोरंजनांत एक लेख लिहून म्हटलें आहे. ही कल्पना त्याकालीं अनेक साहित्यसेवकांना प्रिय होती असें दिसतें. केशवसुतांनी तर तिचा अतिरेक केला आहे. त्यांनी एके ठिकाणीं 'आम्ही कवि काव्यदेवतेचीं भ्रमिष्ट मुलें आहोंत आणि निर्जीवांतला जीव पाहण्यासाठी आम्ही जन्मास आलों आहोंत' असे उद्गार काढले आहेत; तर दुसऱ्या ठिकाणीं 'व्यर्थी अधिकरुचि अर्थ वसे, तो त्यास दिसे, ज्यां म्हणति पिसे' असा सिद्धांत शब्दांत मांडला आहे. एकदा कवीला 'विचित्र पुतळा' म्हटलें आहे, तर दुसऱ्यांदा 'मी एकला फिरतसें बहुवार रानीं, या लागुनी न समजा मजला अडाणी' असा त्याच्या तोंडाने समजुतीचा इशारा वदवला आहे. आणखी एका कवितेंत तर 'डोक्याच्या भ्रमणांचा' व 'विक्षिप्तपणा'चा उल्लेख केला आहे. 'वेडा' हा शब्द केशवसुतांनी 'काव्यविषयक तादात्म्याचा' द्योतक म्हणून प्रयुक्त केला खरा; पण पुढे तो शब्द वापरून अनेकांनी स्वतःचें हसें करून घेतलें.

—६—

१८९७ च्या सुमारास केशवसुत मुंबई सोडून खानदेशांत फैजपूर, भडगांव यांसारख्या आडवळणांच्या गावीं गेल्यावर त्यांना ग्रंथसंग्रह दुर्मिळ झाला. तो विकत घेण्याइतपत त्यांची ऐपत नव्हती; आणि त्यामुळे 'कविता हीच सुंदरी आहे, तिने आपणांस वेडा केलें आहे' या एकाच विषयावर त्यांनी 'रुष्ट सुंदरीस', 'सुंदरी दर्शन', 'मनोहारिणी', 'वियोगामुळें', 'वियुक्ताचा उद्गार', 'स्मरण आणि उत्कंठा', व 'फिर्याद' या कविता लिहिल्या. अशरीरिणी कवितेस मानवी रूप देऊन तिच्यासाठी झुरावयाचें हा प्रकार अद्भुतरम्य खरा. हाच प्रकार चंद्रशेखर व दत्त यांच्या काव्यांतहि आढळतो. परंतु ती अप्रसन्न आहे अशा भावनेने स्वतःच्या मनाला टोंचणी लावून घ्यावयाची हा प्रकार मात्र उचित वाटत नाही. केशवसुतांच्या कवितेंत निराशेची जी एक छटा दिसते तिचें कारण त्यांनी मुद्दाम आपण होऊन उत्पन्न करून घेतलेलें हें एक काल्पनिक दुःख आहे.

कवि, त्याचा अधिकार, त्याचें विश्व, त्याचें कवित्व, त्या कवित्वाचें महत्त्व यासंबंधी केशवसुतांचे विचार जितके मौलिक व अभिनव तितकेच उदार व उदात्त आहेत. सृष्टि आणि कवि, कविता आणि कवि, पटवर्धन यांस, कवितेचें प्रयोजन, भृंग, कवि, शब्दांनो ! मागुते या, धूमकेतु आणि महाकवि, सृष्टि आणि कवि, काव्य कोणाचें ?, क्षणांत नाहीसे होणारे दिव्य भास, आम्ही कोण ? इत्यादि कवितांतून ते इतस्ततः विखुरलेले आहेत. केशवसुतांच्या विचारांत, आचारांत आणि उच्चारांत विसंगति नव्हती. ते महत्त्वाकांक्षी होते. त्यांच्या ठिकाणीं पराकाष्ठेची चिकाटी आणि तीव्र बुद्धिमत्ता वास करीत होती. ते खेड्यांतच राहिले असते तर मग मात्र त्यांचे—

तरी नसतों मी दरिद्री धनाने
तरी नसतों मी क्षुद्र शिक्षणाने
तरी होतीं तीं स्वर्गसुखें थोडीं
तरी नसती कीर्तिची मला चाडी

हे उद्गार सार्थ ठरले असते, आणि त्यांच्या 'लहान्या गरजा' त्या खेड्यांतच सहजगत्या भागून गेल्या असत्या. परंतु मागे सांगितलें त्याप्रमाणे ते 'स्वपथ सोडून फार तेजस्वी होण्याला निघालेले तारे' होते. त्यांना काव्याचा 'सरसवाङ्निष्यंद' चोहोंबाजूंस वाहावयाचा होता, त्यांना 'पुढल्या पिढीचे साक्षी व्हावयाचें होतें; आणि आज ते तसे झालेहि आहेत.

परंतु त्यांना जिवंतपणीं कीर्तीचा लाभ झाला नाही. केशवसुत चारचौघांसारखे मानवच होते. तेव्हा त्यांना लोकेषणा असल्यास नवल तें काय ? पटवर्धन व आपटे यांना उद्देशून त्यांनी ज्या कविता लिहिल्या आहेत त्यांत त्यांनी कीर्तीचा लाभ व्हावा अशी इच्छा प्रकट केली आहे. तेव्हा त्यांना ती असणें साहजिकच होतें. कारण त्यांनी आपलें सारें जीवन कवितेस समर्पण केलें होतें. कवितेच्या निदिध्यासांत त्यांचें संसाराकडेहि दुर्लक्ष होई. ' क्षणांत नाहीसे होणारे दिव्य भास ' या कवितेंत त्यांनी स्वतःस ' आत्माराम ' म्हटलें असून ' संसारा ' स ' अक्काबाई ' म्हटलें आहे. तिच्या फेऱ्यांत आपल्या काव्यसमाधीचा भंग कसा होतो याचें सुंदर शब्दचित्र त्यांनी त्या कवितेंत रेखाटलें आहे. कवितेच्या निदिध्यासांत केशवसुतांचें वर्तनहि एखाद्या वेळीं एखाद्या विदेही आत्म्याला शोभावें असें होत असावें असें वाटतें. कारण १९०५ ' साल अखेर ' मध्ये काव्यरत्नावलीकार लिहितात की, ' त्यांची वृत्ति व्यवहारी दृष्टीने विचित्र व विक्षिप्त असे, आणि याच योगाने कित्येक त्यांना वेडसर समजत, परंतु मूळची त्यांची वृत्ति तशी नव्हती हें आम्ही स्वानुभवानें सांगतों. दोन तीन वेळ त्यांचा आमचा भेटीचा प्रसंग आला. पण त्यांच्यांत संकोचवृत्तीशिवाय आम्हांस दुसरें कांही आढळून आलें नाही. धारवाडास जातांना तुम्ही आमचेकडे मंडळीसुद्धा एक दिवस उतरावें म्हणून आम्ही त्यांस विनंती केली, पण केवळ संकोची वृत्तीने त्यांनी ती अमान्य केली. ' केशवसुतांच्या या संकोची वृत्तीचें चित्र त्यांचे मित्र सुप्रसिद्ध कवि विनायक यांनी मनोरंजनाला ४-१२-५० ला पाठविलेल्या पत्रांत पुढीलप्रमाणे चितारलें आहे; —' केशवसुतांची राहणी साधी, वर्तन पवित्र, विचार काव्यमय आणि भाषणशैली मनोवेधक होती. तो बोलतांना नेहमी खाली पाहून बोले; तथापि केव्हा केव्हा तो मान वर करून पाही, तेव्हा त्याचे पाणीदार !—हें पाणी खरोखर अलौकिक होतें —डोळे श्रोत्यांच्या हृदयाचा वेध घेऊन टाकीत केशवसुतांचे बंधु कै. सीतारामपंत यांनी आपल्या भावाच्या या वृत्तीचें वर्णन करतांना—

संसारीं या क्षणभरि न तें लक्ष त्याचें कधीही-
गेलें, योग्यापरि सतत तो मुक्त जैसा विदेही

असे उद्‌गार काढले आहेत. " [ पाहा. का. र. फेब्रु.०६ ]. केशवसुतांचे परिचित श्री. वा. वा. गर्दे यांनी केशवसुतांच्या या ' वर्तना ' चें वर्णन अशा प्रकारें केलें आहेः—

संसारीं त्वां पथिक जनसें केधवा आचरावें
केव्हां त्वां बा ! निजमनिं जगत्संशयें भ्रांत व्हावें
या वृत्तीचें तव सुकवनीं गूढ बा ! व्यक्त झालें
त्वत्पद्यांनी परिचित कवी–मर्म जाणोनि धाले [पाहा. मनो. पु. ११ भा. ७.]

केशवसुतांना कवितेचा कसा निदिध्यास होता हें यावरून स्पष्ट होईल. परंतु या निदिध्यासांतून त्यांनी निर्माण केलेल्या कवितेचें चारदोन मित्रांपलीकडे कुणी फारसें कौतुक त्यांच्या हयातींत केलें नाही. त्यांच्या कुटुंबीयांनाहि या नादाने त्यांनी संसाराकडे दुर्लक्ष करावें हें पसंत नव्हतें. टीकाकारांकडूनहि खासगी रीत्या त्यांच्या कवितेवर टीका होत असावी असें दिसतें. त्यामुळे साहजिक अगोदरच विषण्ण असणारी केशवसुतांची वृत्ति अधिक विषण्ण झाली असावी असें वाटतें.

— ७ —

.. हरिभाऊ आपटे व कै. प्रि. वासुदेवराव पटवर्धन हे दोघेहि मर्मज्ञ व रसज्ञ केशवसुतांच्या कवितेचे चाहते व भोक्ते ! या दोघांच्याहि रसिकतेवर व वाङ्मयीन गुणांवर स्वतः केशवसुतांनी कविता रचलेल्या ! केशवसुतांच्या पश्चात् १९१७ मध्ये प्रथम हरिभाऊंनी त्यांची समग्र कविता पुस्तक रूपाने प्रसिद्ध करून आपलें मित्रऋण फेडलें. परंतु या आवृत्तीवर केशवसुतांचें संपूर्ण नांवहि नाही ! मग कवितांचें रसिकावलोकन तर दूरच राहिलें. याच सुमारास हरिभाऊंनी रवींद्रनाथांच्या गीतांजलीला मराठी पेहेराव चढवला होता आणि त्याला कवींचें चरित्र व काव्याचें आलोचन यांची जोड दिली होती, त्याप्रमाणे त्यांनी ती केशवसुतांच्या कवितासंग्रहास कां दिली नाही याबद्दल कै. डॉ. गुणे यांनीहि आश्चर्य प्रगट केलें आहे. [पाहा. मनो. पु. २३. भा. ४]. केशवसुतांच्या कवितेची दुसरी आवृत्ती कै. सीतारामपंत दामले यांनी जून १९२१ मध्ये काढली. तिला डे. व्ह. ट्रा. सोसायटीने ६५० रुपयांचें बक्षीस दिलें होतें. तेव्हा वासुदेवराव पटवर्धन हे एक परीक्षक होते. त्यांनी दिलेला अभिप्राय असा आहेः— ' स्वतंत्र स्फूर्तीचीं स्पष्ट लक्षणें, अंतर्भेदी प्रतिभा, वाणी काव्यस्फूर्तीला अनुरूप, रसपरिपोषास अनुकूल, भाषेचे व काव्याचे दोष नाहीत असें नाही. कवितेंत वैचित्र्य आहे, स्वातंत्र्य आहे, ओज आहे, जोर आहे, आत्मप्रत्यय आहे, आषकांचें वेड आहे, देशभक्तांचा कळवळा आहे, स्वयंस्फूर्तीचा विलास आहे, तत्त्वान्वेषाची भेदकता आहे, वागर्थाची संयुक्तता आहे.' [ पाहा. रत्ना. जाने. २६]. हरिभाऊ आणि वासुदेवराव हे केशवसुतांच्या मागे जवळपास १५ व २० वर्षें विद्यमान होते. परंतु या पलिकडे आपल्या या आवडत्या कवीसंबंधीं त्यांनी एकहि ओळ लिहिलेली नाही, असें कां ? या दोघांखेरीज इतरहि अनेक रसिक केशवसुतांच्या कवितेचें भोक्ते होते.

केशवसुतांच्या हयातींतच श्री. रहाळकर यांनी त्यांना उद्देशून लिहिलेली कविता नोव्हें. १९०२ च्या मनोरंजनांत आली होती. कै. काशीताई हेरलेकर या त्यावेळीं ' सुवासिनी ' या नांवाने कविता लिहीत. त्यांच्या केशवसुतांविषयीच्या आदरासंबंधी पूर्वी एकदा लिहिलेंच आहे. १८९८ च्या मनोरंजनाच्या एप्रिल व मेच्या जोड अंकांत ' अलीकडील कवींत आमचे बंधु दामले ह्यांचा नंबर वर आहे' अशी कै. मित्र यांनी त्यांची स्तुति केली आहे. कै. दत्तांनी ' अर्वाचीन कवितेसाठी केशवसुतांची कविता घेतली होती [ पाहा. सुविचार समागम. मार्च १८९९ ] कै. चंद्रशेखरांनी केशवसुत वारले त्यावेळीं कै. मित्रांना धाडलेल्या आपल्या ३-१२-१९०५ च्या पत्रांत ' मनोरंजनाचा डिसेंबरचा अंक आला व त्याचें पहिलें पान उघडून पाहतांच काळ्या रेघांची चौकट दिसली. काय आहे म्हणून पाहिलें तों केशवसुतांचा मृत्यु. शिव ! शिव ! अर्वाचीन कवींतला एक चांगला कवि काळाने गिळंकृत केला ! फार वाईट झालें !' असा, आपला आदर व्यक्त केला होता. तात्पर्य, केशवसुतांच्या कवितेला रसिक नव्हते असें नाही. परंतु तो काळच मुळीं साहित्याला अनुकूल नव्हता. चारदोघां आस्थेवाईक रसिकांखेरीज त्या काळीं साहित्याची फारशी चूज नव्हती.

केशवसुतांच्या ' अशी असावी कविता फिरून, तशी नसावी कविता म्हणून ' किंवा ' त्याला मान नसे, नसो; पण आता त्याची अपेक्षा नसे, हें कोणि म्हणतां विषाद अहिसा मन्मानसाला डसे !' अथवा 'ज्यांला मी मुकलों विषाद मजला याचा मुळींही नसे, जें पृथ्वीवर आणिलें जन तया धिक्कारिती हा ! कसे ! ' या उद्गारांवरून त्यांच्या कवितांवर टीका

होत असावी आणि ती त्यांना विव्हल करीत असावी असें दिसतें. ' कविता आणि कवि ' ही तरुणवयांतील बेपर्वाईची कविता केशवसुतांनी कै. वामन दाजी ओक यांना अनुलक्षून लिहिली आहे की काय कांही कळत नाही. ओकांची आणि केशवसुतांची नागपूरच्या मुक्कामांत कदाचित् गाठहि पडली असावी. त्याकाळीं कै. हरि माधव पंडित आणि वामनराव ओक यांच्या हातीं ' विविध- ज्ञान—विस्तारा'चीं संपादकीय सूत्रें होतीं. हे दोघेहि मोठे काव्यमर्मज्ञ व रसिक होते. यावेळीं नागपुरास विद्यार्थी असलेल्या पटवर्धनांनी पुढे 'कै. हरि माधव पंडित यांचा मृत्यु' या आपल्या कवितेंत या दोघांना ' काव्याचे कलेजे व कंद ' म्हणून संबोधलें आहे. [ पाहा. अभिनवकाव्यमाला भाग ३ रा. कवि ' वसंत ' ]. ओक हे काव्यपरीक्षणाच्या बाबतींत मोठे विचक्षण होते. कै. माधवानुजांची त्यांच्यावर एक कविता आहे. कै. रेव्हरंड टिळक हेहि ओकांना मान देत. कवीने आपल्या नांवाने आपली कविता प्रसिद्ध करूं नये; कारण नामनिर्देशाने कवीची व त्याच्या काव्याची किंमत कमी होते असें त्यांचें मत होतें. [ पाहा. टिळकांची कविता. वालोद्यान पृ. ९७ ] ' कविता आणि कवि ' या अगदी साध्या व सरळ कवितेंत केशवसुतांनी मध्येच 'स्वभावभूयिष्ठ जिच्यांत माधुरी, अशी तुम्हांला कविता रुचे जरी ' असा एक अगडबंब शब्द वापरला आहे. हा शब्द ओकांचा आवडता होता. कारण १८८५ च्या विविधज्ञानविस्ताराच्या एप्रिल, मे, जून जुलैच्या जोड अंकांत कै. कीर्तिकरांच्या ' इंदिरा ' काव्यांचें परीक्षण करतांना त्यांनी तो वापरला आहे. केशवसुतांच्या 'शब्दांनो ! मागुतें या ! ' या कवितेंतील ' नूत्न ' हा शब्द कै. तात्यासाहेब केळकर यांना चिंत्य वाटत होता. पण तो १८८२ सालीं प्रसिद्ध झालेल्या 'कपोतचरित्रा'त अमीरकर नांवाच्या, कवींनी आणि ' कन्या ' या आपल्या कवितेंत ओकांनी योजिला आहे. ओकांची कविता ' अर्वाचीन मराठी कवितें'त आहे. १८८५ च्या सुमारासच केशवसुतांनी कवितालेखनास प्रारंभ केला. तेव्हा विविधज्ञानविस्तारांत प्रसिद्ध होणारी महाजनि, कीर्तिकर, मोगरे इत्यादिकांचीं काव्यें त्यांच्या दृष्टीसमोर होतीं यांत शंका नाही. इंग्रजी कवितांचीं रूपांतरें करण्याची स्फूर्ति त्यांना महाजनींचीं तसलीं रूपांतरें वाचून झाली असावी. ' गावीं गेलेल्या मित्राची खोली ' आणि ' भृंग ' यांवर अनुक्रमें ' जलधरमाला वृत्ताच्या चालीवर ' आणि ' मणिबंधाच्या चालीवर ' असे जे निर्देश आहेत, ते केशवसुतांनी उघड उघड कीर्तिकरांच्या 'इंदिरे' वरून घेतले आहेत. आपल्या कवितांना विविधज्ञानविस्तारांत स्थान मिळावें असें केशवसुतांना वाटत असे. आणि त्यांत खरोखर वावगें असें कांहीहि नव्हतें. मोगऱ्यांचीं स्फूर्तिहीन काव्यें त्यांत प्रसिद्धि पावतात तर मग आपलीं उत्स्फूर्त काव्यें त्यांत कां येऊं नयेत अशी त्यांची शंका असे, असें कै. सी. के. दामले यांनी त्यांच्या चरित्रांत नमूद केलें आहे. तेव्हा केशवसुतांच्या विषण्णतेचें कारण त्यांच्या कवितांची बूज कांही जणांकडून झाली नाही हेंहि असणें शक्य आहे. 'दुर्मुखलेला'ला या आपल्या कवितेंत केशवसुतांनी ' विद्यासंस्कृत ' या प्रयोगाने जसा कै. वामनराव आपट्यांना टोमणा दिला आहे, तसाच तो ' स्वभावभूयिष्ठ ' या प्रयोगाने कै. वामनराव ओकांना हाणला असावा असा माझा अंदाज आहे.

केशवसुतांच्या कवितेंत काव्यदोष व भाषादोष आहेत असें वासुदेवराव पटवर्धनांनी नमूद केलेंच आहे. तेव्हा त्यांवर टीका झाल्यास वस्तुतः विषाद वाटण्याचें कांही कारण नाही. परंतु प्रतिकूल टीका कुणास प्रिय असते ! तेव्हा केशवसुतांना तिच्यामुळे वाईट वाटणें स्वाभाविक होतें. केशवसुतांना इंग्रजी कवितांची ओढ पराकाष्ठेची होती. त्यांनी त्यांतील भाव, विचार व कल्पना मराठींत मांडण्याचा प्रयत्न केला. परंतु तो काळ साहित्याच्या क्षेत्रांत

संक्रमणाच्या स्वरूपाचा असल्यामुळे त्यांना बेमालूम रूपांतरें साधलीं नाहीत. ‘ Doth then the world go thus, doth all thus move ? ’ या Drummond च्या कवितेचें त्यांनी ‘ जायाचें जग कां असेंच ? सगळें ऐसेंच कां चालणें ’ असें रूपांतर केलें आहे. वास्तविक त्यांतील भावार्थ ‘जगाची ही राहाटी अशीच राहाणार की काय’ असा आहे. याच कवितेच्या शेवटच्या श्लोकांत त्यांनी ‘वा साधु आणीक असाधु यांचें, समप्रकर्षी युग आण साचें ’ असा उदार विचार मांडला आहे.. पण त्यासाठी ‘ साधु आणि असाधु ’ हे जे शब्द प्रयुक्त केले आहेत ते मराठी भाषेच्या दृष्टीने हास्यास्पद आहेत. वस्तुतः त्यांना त्या शब्दांनी ‘ श्रीमंत व अनाथ ’ हे अर्थ सूचित करावयाचे आहेत. ‘काव्य कोणाचें ?’ या कवितेंत केशवसुतांनी आपल्या एका कल्पित मित्राच्या मुखाने स्वतःच्या काव्यासंबंधीं पुढील शंका प्रकट केली आहे. तो मित्र केशवसुतांना विचारतो की,

“ काव्य लिहिलें हें सत्य तूं असून, नव्हे माझें. हें नव्हे तें म्हणून ”
सांगशी, तर परकीय कल्पनांतें, तुवां वेउनि योजिलें, गमे मातें ”

यावर “ नव्हे ऐसेंहि ” असें उत्तर देऊन केशवसुत त्याच्या शंकेचें समाधान करतात खरें; परंतु त्यांच्या अनेक कवितांत आपल्या समाजाच्या दृष्टीने विसदृश वाटणाऱ्या अशा कल्पना आणि भाषेच्या दृष्टीने चमत्कारिक वाटणारे प्रयोग आले आहेत. F. Lyle च्या Cupid and campaspe या कवितेचें ‘ मदन आणि मदनिका ’ हें रूपांतर बेमालूम व्हावें म्हणून त्यांनी मूळांत जेथे पत्त्यांच्या खेळाचा उल्लेख आहे, तेथे सोंगट्यांचा खेळ घातला आहे. कारण त्या काळीं पत्ते आजच्या इतके सार्वत्रिक झाले नव्हते. परंतु Herrick च्या To daffodiles and To Blossoms चें ‘ जास्वंद आणि पारिजात ’ असें महाराष्ट्रीकरण करतांना त्यांना अवधान राहिलें नाही, आणि ‘ मरून मातींतच या पडाल, अज्ञात ऐशा थडग्यांत जाल ’ या ओळी ते लिहून गेले. ’ या ओळींतील ‘थडग्या’च्या उल्लेखामुळे महाराष्ट्रीकरण बरोबर झालें नाही. ‘ A wit's a feather ’ यावरून सुचलेली ‘ कीर्ति म्हणजे काय रे ?–एक पीस, शिरीं लोकांच्या त्यास चढायास ’ ही कल्पनाहि आपल्या समाजाच्या दृष्टीने हास्यास्पद आहे. कारण विजयाचें चिन्ह म्हणून पिसें टोपींत खोवण्याची चाल आपल्यांत नाही. ‘ कचाप्रत देवयानी’मधील ‘घालून निराशेचें अंडें, आशा अहा ! उडुन गेली ’ ही कल्पनाहि पुराणकाळांतील कथेंत व केशवसुतांच्या सोवळ्या जमान्यांत हास्यास्पदच होती. तेव्हा केशवसुतांच्या या कल्पना टीकेचा विषय झाल्या असल्यास आश्चर्य नाही. शब्दयोजनेच्या बाबतींतहि केशवसुत चोखंदळ नव्हते. ‘ मंदिर ’ हा शब्द त्यांनी ‘ हवेली ’ या अर्थाने प्रयुक्त केला आहे.

‘ तुतारी’च्या आवाजाला ते ‘ किंकाळी ’ म्हणतात. वस्तुतः ‘ किंकाळी ’ मनुष्य घाबरला की फोडतो. समाजास जागृत करावयास निघणाऱ्या माणसाने ‘ किंकाळी ’ कशास फोडावयाची ? आपल्या चपल बुद्धीच्या लहान भावाने कुलदीपक व्हावें ही कल्पना ते ‘ बापू ! जनांत दिवटी धरशील काय ? ’ या भाषेने व्यक्त करतात. तेव्हा त्यावर टीका व्हावी यांत अयोग्य तें काय होतें ? केशवसुतांनी भाषा कमावलेली नव्हती आणि त्यामुळे असे दोष होत. कदाचित् चारचौघांत कवितांचा विषय चर्चेस निघाला असतांना अशा प्रकारची टीका होत असावी असें वाटतें. कारण केशवसुतांनी आपल्या एका पत्रांत ‘ कवि संमेलना’संबंधीं पुढील मत प्रकट केलें आहे:—

As to the idea of an annual gathering of poets :--Practical men meet periodically for practical purposes. Poets as dreamers should sit aloof, listening to the ethereal voice of silence and trying to render it into their uncouth vernaculars, whenever the Muse favours them. Some two or three congenial spirits may at times come together to sip the rainbow drops of the nectar; but more would certainly spoil its flavour—That is my idea.' [पाक्षा. मनो. पु. ११. भा. ७].

— ८ —

प्रतिकूल आर्थिक परिस्थिति हेंहि केशवसुतांच्या निराशेचें एक कारण होतें. केशवसुतांनी आपल्या ' दिवाळी ' या कवितेंत—

लक्ष्मीपूजन तें द्वितीय दिवशीं रात्रौ जधीं होतसे
सोनें आणि वह्या धनीजन तधीं मांडून अर्चीतसे,
साध्याला विसरून लोक धरिती भक्ती कसे साधनीं—
ये हा आशय अर्थहीन कविच्या चित्तांत तें पाहुनी !

असा एक विचार मांडला आहे, आणि त्यांत आपल्या अर्थहीनतेचा स्पष्ट निर्देश केला आहे. ' निशाणाची प्रशंसा ' आणि ' कवितेचें प्रयोजन ' या कवितांत त्यांनी ' जीवनाला समर ' म्हटलें आहे. परंतु ' हें समर ' जिंकावयाचें असेल, तर ' अर्था'सारखें अमोघ अस्त्र हवें हें त्यांनी इतर अनेक नामवंत साहित्यिकांप्रमाणे लक्षांत घेतलें नाही. वैचारिक साहित्य आणि स्वयंपाकाचें साहित्य यांच्या द्वन्द्वांत साहित्यिकाचे कसे हाल होतात याचा अनुभव कुणास नाही? कवितालेखन हा केशवसुतांच्या विरंगुळ्याचा एकमेव विषय होता. परंतु त्यांना उभ्या आयुष्यांत स्थैर्य असें कधीच लाभलें नाहीं. शिक्षणासाठी त्यांना बडोदें, नागपूर, पुणें अशी त्रिस्थळी यात्रा करावी लागली. पोटासाठी त्यांना मुंबई, कल्याण, सावंतवाडी, फैजपूर, भडगाव व धारवाड या ठिकाणीं पायपिटी करावी लागली. १९०३ च्या सुमारास ते धारवाडास गेले. या वेळीं ते चाळिशीच्या घरांत होते. कवितेपासून त्यांना कीर्तीचा अथवा संपत्तीचा लभ्यांश झाला नव्हता. अजून आपण किती भटकणार या विचाराने ते त्रस्त झाले. ज्या कवितेला त्यांनी आपलें सर्वस्व दिलें, तिच्यावरच त्यांनी ' फिर्याद ' गुदरली, आणि तींत आपलें अंतःकरण उघडें केलें—

जिने मला वेडा केलें तिच्यावरी ही फिर्याद !
ध्यास तिचा घेउन फिरलों शून्य दिशा रानोमाळ
तिचेवरी गाणीं वेडीं गाइलीं क्रमाया काळ !
स्वप्नांतचि केव्हा भेटे नेते तों स्वर्गद्वारीं,
लोटिते मागुतीं खाली भूतलावरी अंधारीं !
तेणें मी विव्हल भारी संसारीं परि करमेना
॥ धन न करीं, वणवण करितां जम कोठे नीट जमेना !
तरि तिलाच चित्त ध्यातें
निद्रेविण रजनी जाते !
आप्तवर्ग म्हणती " यातें—
कुठली ही जडली ब्याद "

जिने मला वेडा केलें तिच्यावरी ही फिर्याद !
हीन दीन झालों छंदी फंदी मी तुझिया नादीं
त्यामुळे परी न मनाला घालितों कधींहि विषादीं;
'बूज तुवां या दासाची केली गे नाही अजुनी,
दुःख हेंचि वाटे म्हणुनी गातसें अशीं गाऱ्हाणीं !

या कवितेंत केशवसुतांचा कवितेचा निदिध्यास, संसृतिविमुखता, प्रतिकूल आर्थिक परिस्थिति, अस्थैर्य, आप्तांचा रोष आणि असफलता या सांऱ्यांचा स्पष्ट उल्लेख आहे. तेव्हा केशवसुतांच्या कवितेंतील निराशा त्यांवरून सहज उमगेल !

— ९ —

केशवसुतांच्या कवितेंत निराशा आहे त्यामुळे त्यांच्या कवितेला कमीपणा येतो अथवा कवि म्हणून त्यांची थोरवी कमी होते असें मुळींच नाही. त्यांच्या कवितेंत निराशेप्रमाणे आशाहि आहे. तुतारी, स्फूर्ति, नवा शिपाई, गोफण, निशाणाची प्रशंसा इत्यादि त्यांच्या कवितांत ओज आहे. तें वाचकांच्या नसांत नवरक्ताचा संचार करते आणि त्याला पुरुषार्थास प्रवृत्त करते. नव्या मनूचा साक्षात्कार प्रथम केशवसुतांच्या कवितेंत झाला म्हणून ते आधुनिक कवितेचे प्रवर्तक होत याबद्दल वाद नाही. परंतु त्यांच्या कवितेचा अभ्यास करतांना तिची फक्त एकच बाजू पुढे मांडण्यांत येते. अभ्यास सर्वांगीण हवा. म्हणजे सर्व बाजू नीट रीतीने लक्षांत येतात. हा महान कवि अनुकूल परिस्थितींत वाढला असता, तर त्याचें काव्य विशाल, व्यापक व विस्तृत झालें असतें. तें तसें कां झालें नाही हें दाखविण्याचा हा एक लहान साधार प्रयत्न आहे.

---

## दोन अभंग

आषाढमासींच्या काळ्याभोर रात्रीं,
गारठे धरित्री । वर्षावांत
डोंगरांवरील गर्द आंबराई,
काळोखांत होई । गुप्तरूप
झरे खळाळती भुईच्या उदरीं,
पावसा माझारीं । तेहि लुप्त
लाटा आपटती खडपाच्या वरी,
सागर हो परी । तमावृत
तोंच चमकावी चपला क्षणिक,
दिसावें वेधक । दृश्य डोळां
तेवी तुझी भेट फारा दिवसांनी,
जीवनास आणी नवी कळा

जीवन हें तुझें ब्रह्मारण्यापरी,
विस्मयित करी । मम जीवा
पंचगंगेपरी झरतसे भाव,
तुझा गे स्वभाव । मधुरसा !
अद्‌भुत मोहक तुंग घनघटा,
वेणींतल्या छटा । तेवी तुझ्या
परी पलीकडे कोंकण बाजूस,
पाषाणांची रास । मात्र उभी
न मिळे छद्रूप, न दिसे ओलावा,
कासया सुकावा । स्नेहभाव ?
तुझीया मनाचें स्वरूप दुहेरी,
विस्मया माझारीं । टाकी मज !

— ना. ग. जाशा

## ज्ञानदेवांची अकालीं समाधि : : सुमति पोंक्षे

साहित्य-पत्रिकेच्या १९५२ सालच्या १०१-व्या अंकांतील " ज्ञानदेवांची अकालीं समाधि " हा लेख वाचून जे विचार सुचले ते मांडीत आहें. परंतु माझी भूमिका वरील लेखांत सुचविल्याप्रमाणे ' योगशक्तीच्या सामर्थ्याचा खुलासा करणाऱ्या तज्ज्ञाची ' नसून एका सामान्य वाचकाची प्रतिक्रियात्मक आहे.

प्रत्येक जीवमात्राचा एक विशिष्ट जीवितहेतु असतो. तेवढें कार्य संपतांच जागा खाली करून घेणें हा सृष्टीचा नियमच आहे. पान पिकलें की, झाडावरून गळून पडलेंच पाहिजे. कारण झाडाचा अन्नरस तयार करणें, श्वासोच्छ्वास करणें हीं त्याचीं जीवितकार्यें त्याने आतापर्यंत चोख बजाविलीं; परंतु तीं त्यापुढे चालू ठेवण्यास तें असमर्थ असतें. मुंग्या-मधमाशांसारख्या कीटकांच्या वसाहतींची व्यवस्था पाहिली तरी हा न्याय काटेकोरपणाने पाळला जातो, असें दिसतें. तेथून तों थेट हिंदुधर्मातील दशावतारांचीं चरित्रें पाहिलीं तरीदेखील कोणत्या तरी हेतूस्तव जन्म घेणें व तो पूर्ण होतांच निजधामास जाणें, हीच घटना सर्व देवावतारांत घडलेली आढळते. मग निसर्गाच्या हातांतील बाहुलें जो मानव, त्याने मात्र ह्या सृष्टिनियमांवर मात करावी, ही अपेक्षाच अवास्तव नव्हे काय !

" ज्ञानेश्वर नुसते प्रतिभासंपन्न कविराज आणि संतश्रेष्ठ होते एवढेंच नव्हे, तर ते समाजधारणेविषयीहि जागरूक होते. " आणि म्हणूनच त्यांनी सृष्टिनियमांविरुद्ध बंड पुकारण्याची विपरीत शिकवण लोकांना दिली नाही. श्रीकृष्णाच्या शब्दांत योगाची व्याख्या ' योगः कर्मसु कौशलम् ' अशी आहे. ज्यांना आपण चमत्कार मानतों त्या सर्व अणिमादि-सिद्धिप्राप्ति वगैरे ह्या 'योगः कर्मसु कौशलम्' याचींच अंगें आहेत. हठयोगाने शरीर वज्रासारखें सुदृढ बनवून तें हजारों वर्षें टिकविलें तरी कल्पान्ताचे वेळीं नाश पावणारच. अशा योगयागांनी मृत्यूवर मात करूं पाहणें म्हणजे अवश्यंभावी घटना कालान्तरावर टाकणें, एवढेंच म्हणतां येईल. अशा तऱ्हेच्या 'योगः कर्मसु कौशलम्'-ने—व्यवहारांत ज्याला 'हातचलाखी' असा एक साधासुधा शब्द आहे—वाटेल त्या अतर्क्य गोष्टी संपादन करून दाखविल्या की, त्यांचा प्रसार व्हायला वेळ लागत नाही. मग त्यांचा उपयोग सज्जनांबरोबर दुष्टदेखील करणारच. असे अनेक लोक एकमेकांचें मन बदलूं शकले व परकायाप्रवेश करूं लागले तर मोठा अनवस्थाप्रसंग येईल. हें हठयोगाचें बूमरँग सामान्य लोकांच्या हातीं पडूं न देण्यासाठी जाणत्यांनी स्वतःच त्याचा उपयोग करण्याचें टाळावें, हा उत्तम उपाय. परकायाप्रवेश व चमत्कार यांनी कांही थोड्या कालापुरताच राजा रामदेवाच्या विजयाचा देखावा निर्माण करण्या-पेक्षा ज्ञानेश्वरांनी जनतेला शाश्वत कल्याणाचा मार्ग दाखविला व स्वतःचें जीवितकार्य पूर्ण केलें, हेंच सुजाणपणाचें नव्हे काय !

योगसामर्थ्याची अखेरची कसोटी मनोजयांत आहे. संत चांगदेवांची कथा प्रसिद्ध आहे. स्वजनांबद्दल वाटणाऱ्या सुखदुःखादि भावनांवर प्रभुत्व मिळविणें हें एका योगिराजालाच साधतें. राजा रामदेवावरचें व हिंदुधर्मावरचें एक संकट निवारण केलें तरी पुन्हा-पुन्हा दुसरें कांही तरी उद्भवत राहिलेंच असतें. त्यापेक्षा मोठ्या संयमपूर्वक भवितव्यतेचा मार्ग मोकळा ठेवून ज्ञानेश्वरांनी योग्य कालीं समाधि घेण्याचें ठरविलें असावें.

अनुक्रमणिका

श्रीकृष्णाची भूमिका 'गोष्टी सांगेन युक्तिच्या चार'; तीहि ज्ञानेश्वरांनी योग्य तऱ्हेने पार पाडली आहे. जी गीता श्रवण केल्यामुळे अर्जुन आपलें मनोमालिन्य झटकून टाकून युद्धोन्मुख झाला आणि पुढे त्या युद्धांत विजयीहि झाला; त्याच गीतेचें सुबोध, अमृतोपम भाषांतर व विवरण ज्ञानेश्वरांनी मराठींत केलें—अगदीं, राजा रामदेवाच्या मायबोलींत, त्याच्या अंतःपटावर बिंबण्यायोग्य स्वरूप, गीतेला दिलें. कोणी झालें तरी आणखी काय करूं शकलें असतें !

भवितव्यतेचा ओघ अडविणें श्रीकृष्णांनासुद्धा शक्य झालें नव्हतें. एका यःकश्चित् यादव-वीराचा तीर पायाला लागून श्रीकृष्ण घायाळ झाले. यादव-स्त्रिया यवनांनी पळवून नेल्या. परंतु भीष्मासारखे इच्छामरणसुद्धा देवांना जमलें नाही; किंवा स्वकुलांतील स्त्रियांचें रक्षण करण्याला जिवंत राहतां आलें नाहीं. निदान एखाद्या चमत्काराने त्यांना पुढील रक्षणाची तशी कांही तरतूदहि करतां येऊं नये ? प्रत्यक्ष पूर्णावतार श्रीकृष्णांच्या सामर्थ्या-पलीकडील का ह्या गोष्टी होत्या ? एका द्रौपदीसाठीं कुरुक्षेत्रावरील घोर संग्राम करणाऱ्याने इतक्या कुलस्त्रियांसाठीं कांहींच करूं नये ? कां देवांना अशा अतर्क्य गोष्टींचा आश्रय घेणें अयोग्य वाटलें ?

त्याचें कारण एवढेंच दिसतें की, कालचित्रपटांतील सर्व दृश्यें अगोदरच नियोजित असावींत. कृष्ण, अर्जुन, द्रौपदी, दुर्योधन, यवन, राजा रामदेव, ज्ञानेश्वर हीं सर्व त्या-त्या वेळीं आविर्भूत होणाऱ्या दृश्यांतील एकेक अंग मात्र होतीं. व्यष्टि व समष्टि यांच्या प्रारब्धानुसार घडणाऱ्या ऐहिक घटनांवर कोणाचाच अधिकार चालत नाही. अधूनमधून उलटापालट झाल्या-सारखे जे चमत्कार वाटतात तेहि अगदीं सृष्टिनियमांनीं बद्ध असे सामान्य व्यवहारच असतात. नव्या गोष्टींचें आकलन होईपर्यंत मानवी मनाला तो चमत्कार वाटतो इतकेंच ! निर्जीव आगगाडी चालतांना पाहून तिच्यापुढे भक्तिपूर्वक मस्तक नमविणारे आजोबा अलीकडेपर्यंत समाजांत होते. परंतु ॲटमबॉंबचें खेळणें हातांत घेऊनच जन्मास येणाऱ्या आधुनिक पिढीने त्यांचा उपहास करण्यासारखें कांही नाही. निसर्ग नियमांची गूढता आणि मानवी बुद्धीची पोच ह्यांतील तफावतीवर चमत्कारांचें अस्तित्व अवलंबून असतें.

शिवाय वेदांतील मायावाद आणि मिथ्यावाद ह्यांनी सर्व प्रश्नचिन्हांना पूर्णविराम दिला आहे. सिद्धि वगैरे मिथ्या आहेत; खऱ्याशा भासल्या तरी सत्य म्हणतां यावयाच्या नाहीत. तेवढ्या कालापुरत्या कांही विवक्षित कारणास्तव त्या आविर्भूत झाल्यासारख्या भासतात, इतकेंच. व्यक्तींच्या फलोन्मुख कर्मांमुळे वेळोवेळीं कांही अतर्क्य गोष्टी घडलेल्या दिसतात व मग त्यांच्या कर्तृत्वाचें श्रेय कोणाकडे तरी जातें; आणि त्यालाच आपण चमत्कार, योगसामर्थ्य वगैरे नांव देतों.

चमत्कारांनीं बुद्धिपालट करणें हा कांहीं एखाद्या राष्ट्राच्या रक्षणाचा खरा उपाय नव्हे. त्यामुळे जनतेचें आलस्य, दौर्बल्य हीं मात्र वाढीस लागतील. स्वरक्षणासाठी स्वसामर्थ्याचा प्रत्ययच यायला हवा. दुसऱ्यांच्या योगबलांचा हवाला देणें म्हणजे दुबळेपणाला आवाहनच होय.

सर्व कल्पना सापेक्ष असतात, असें म्हणतात. स्वधर्मरक्षणार्थ झगडणाऱ्या स्वजनांचें हित करायला जावें, तर नास्तिक यवनांचा निःपात करायला हवा. परंतु यवनदेखील त्यांच्या स्वतःच्या श्रद्धेप्रमाणे अत्यंत आस्तिकच होते; काफिरांवर आक्रमण करून प्राणपणानें स्वतःचा धर्मप्रसार करायलाच तर ते आलेले होते. ज्ञात्याच्या मतें असल्या घटनांना मुलांच्या खेळाहून जास्त महत्त्व नाहीं. त्या खेळांत भाग घेणाऱ्या बालकाचें अंग कधीं खरचटून निघेल, तर कधी

विजयश्रीहि मिळेल. परंतु कौतुकाने खेळाचें नुसतें साक्षित्व करणाऱ्या श्रीज्ञानेश्वरांसारख्यांना त्याचें काय सुखदुःख !

उपनिषदेंच सांगतात—

द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते ।
तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्न्योऽभिचाकशीति ॥

म्हणून आपलें जीवितकार्य संपल्याबरोबर समाधि घेण्यांत ज्ञानेश्वरांनी औचित्य साधलें, असेंच म्हणावें लागेल.

---

## ज्ञानदेवाची आत्महत्या : : वा. वि. जोशी

ज्ञानेश्वराने अकाली आत्महत्या कां केली, म्हणजे समाधि कां घेतली, हा प्रश्न सहा-सातशे वर्षांनी विद्वानांना कुतूहलाचा वाटावा, हें त्याचें नशीबच ! नाहीतर वैराग्यशील संत तुकारामाने छप्पन्नाव्या वर्षी आसन्नप्रसवा भार्येला सोडून आत्महत्या, म्हणजे सदेह स्वर्ग कां गाठला ? बालब्रह्मचारी रामतीर्थांनी तिसाव्या वर्षी गंगेंत जीव कां दिला ? कुमारीलभट्टाने चिता रचून स्वतःला जाळून कां घेतलें ? श्रीकृष्णाच्या हीनमरणाची वार्ता ऐकून द्रौपदीसुद्धा पांचपांडवांनी आणि पराक्रमाची इतिश्री पाहणाऱ्या रामलक्ष्मणभरत बंधूंनी हिमालयांत जाऊन जीव कां दिला, ह्या अनेक प्रश्नांतून फक्त ज्ञानेश्वरांच्या आत्महत्येबद्दल येवढें औत्सुक्य विद्वानांना वाटावें, ह्याचें कारण येवढेंच की षड्रिपूंनी वा निदानपक्षीं रोगराईनी थोर थोर महात्मे जसे जमीनदोस्त झाले, तसा जमीनदोस्त ज्ञानेश्वर झाला नाही, ह्याबद्दल त्यांना रुखरुख वाटत असावी. ज्ञानेश्वराचें मोठेपण ह्याच्यांत होतें की, त्याला देहाचें ममत्व अगर स्वकर्तृत्वगारीचा अहंकार वाटला नाही. ' बोले तैसा चाले ' हें खरें करून दाखविणारा असा हा एकटाच संतमहंत निघाला.

ज्ञानेश्वर गीतेपेक्षा सरस भाष्य करूनच राहिला नाही; तर शुद्ध गीता सांगणाऱ्या कृष्णाला जें स्वतः नव्वदाव्या वर्षी करतां आलें नाही, करण्याची हिंमत झाली नाही, करण्याची बुद्धि सुचली नाही, तें इच्छामरणाचें दिव्य ज्ञानेश्वराने निर्शीत करून दाखविलें, त्यांतच त्याचें अद्वितीय मोठेपण होय ! खुद्द गीता सांगणाऱ्या कृष्णाचें पूर्वचरित्र हेंहि ज्ञान-प्राप्तीनंतरच्या अखेरीच्या चरित्राइतकेंच सर्वथैव लौकिक असें होतें, ही गुप्त ठेवलेली पार्श्वभूमि गीतेंत सांगितलेल्या भव्य तत्त्वज्ञानाला अनुभवाचे बोल म्हणून लटकें ठरवितें. अपद्घात मुलाबायकांच्या घोळक्यांत व्याधाचा बाण लागून गीतेचा वेदांती कर्ता एखाद्या कोळी-कातवड्याप्रमाणे मरेल अमर मेला हें खरेंसुद्धा वाटलें नसतें; वाटत नाही ! ' पुराणांतली वांगीं पुराणांत ' ह्या संप्रदायाचा संस्थापक म्हणून श्रीकृष्णाकडेच अग्रपूजेचा मान जातो. तेव्हा गीतेचें तत्त्वज्ञान विशद करणाऱ्या ज्ञानेश्वराने श्रीकृष्णाप्रमाणे शंभर टक्के लौकिक व केळीं दुटप्पी आयुष्य कंठावें, अशी सामान्य जनांची अपेक्षा असणें साहजिकच आहे.

योगसामर्थ्याने त्याने क्रांति कां केली नाही? प्रश्नाला उत्तर म्हणून उलट प्रश्न विचारतों, अरविंद घोषाने योगसामर्थ्याने स्वराज्याची क्रांति कां घडवून आणली नाही? वस्तुतः तत्त्वें, संतमहंत, हे अनुयायांच्या मेळाव्यांत आणि तेहि दर्शनापुरतेच पूज्य असतात; निदान ज्या त्या काळांत त्यांना अनुयायीहि फार कमी असतात. 'सर्व जग खोटें नाटक' मानून वैतागून देव-पूजेला लागलेले उदासीन अनुयायी देशासाठी वा कर्मासाठी थोडेच कष्ट सोसणार आहेत? योगसामर्थ्याने यःकश्चित रोगाचेंहि निवारण करतां येत नाही. रामकृष्णपरमहंस कॅन्सरने सडून सडून, तर अरविंद घोष मूत्रपिंडाच्या दीर्घपीडाविकाराने वारले. ह्या दोघा तत्त्ववेत्त्या योग्यांना योगाने रोग बरे करतां आले नाहीत, इच्छामरणहि पत्करून स्वतःचे देहकष्ट व शिष्यांचे क्लेश दूर करतां आले नाहीत, वेदांती असतांनाहि क्षणभंगुर देहाचा अखेरपर्यंत मोह सुटला नाही. ज्ञानेश्वराला केवळ संन्याशाचा मुलगा म्हणून बालपणीं येवढे कष्ट पडले, तरुणपणीं येवढा अपमान सहन करावा लागला की, देहाबद्दल ममत्व त्याला कधीच वाटलें नसावें. मी मी म्हणणाऱ्या ऋषिमहर्षींना कामक्रोधादींनी जर्जर केलें, हीन केलें हें माहीत असणाऱ्या ज्ञानेश्वराला 'असाध्य तें मी साध्य करीन' हा अहंकार वाटला नसावा, अगर 'मी मेलों तर जगाचें काय होईल?' हा लोंचट वृद्ध पुढाऱ्यांना वाटणारा अहंकार वाटला नसावा! आणि हा अहंकार अवघ्या बत्तिसाव्या वर्षीं मेलेल्या खुद्द आद्य शंकराचार्यांलाहि वाटला नाही. आत्महत्येचा प्रयत्न करणें हा नवीनच गुन्हा १८५६ सालीं इंडियन पीनलकोडने ठरविल्यापासून इच्छामरण बंद झालें, म्हणून गर्ह्य वाटूं लागलें येवढेंच. वास्तविक पाहतां माणसाला इच्छेप्रमाणे जगण्याचा जसा हक्क असावा तसाच इच्छेला वाटेल तेव्हा मरण्याचाहि मूलभूत हक्क असावा. मरणाची बाब काय तेवढी रोगाच्या अगर बेकारी–उपासमारी ह्यांची खैरात करणाऱ्या सरकारच्याच फक्त स्वाधीन राहावी, रोगाला अगर सरकारला वाटेल त्याला आणि वाटेल तेव्हाच मारण्याची मुभा असावी, अशी आपली दृढ समजूत व आजची स्थिति आहे. चीनमध्ये आत्महत्येचें प्रमाण पुष्कळ आहे, आणि त्याला बंदी नाही. जपानी लोक शत्रूच्या स्वाधीन होण्याच्या अगोदर हाराकिरी करतात. खुद्द हिटलरसारख्या जगज्जेत्याने स्वतःचें मरण ओढवून घेतलें–तर ज्या त्या काळांत अप्रसिद्धपणें कष्टांत जीवित कंठणाऱ्या कोणा संतमहंताला मात्र मरणाचा हक्क नसावा? हें कां तर टीकाकारांना आज वाटतें की त्या संताने कष्टांत पुष्कळ जगून न भूतो न भविष्यति क्रांति घडवून आणायला पाहिजे होती. ज्ञानेश्वर त्रिकालज्ञ होता, त्यानेहि ओळखलें असेल की, सर्वच कार्यें आपणच एकट्याने योगसामर्थ्याने संपवून टाकलीं तर टीकाकारांच्या पुरुषार्थाला जागाच रहाणार नाही, म्हणून अशा पराक्रमशील टीकाकारांच्या पराक्रमाला वाव मिळावा, त्यांना आपल्यापेक्षाहि मोठे होतां यावें, यासाठी मुद्दामच त्याने क्रांतीचें कार्य स्वतः पुरें न करतां पाय काढला असावा, हेंहि भाविकतेच्या भूमिकेवरून मरण्यासारखें आहे.

भीष्मासारखे पराक्रमी पुरुष इच्छामरणी होते, म्हणजे ते आपलें मरण स्वेच्छेने ओढवून घेत असत. भीष्माने तडकाफडकी वायु कुंठित करून जीव दिला नाही, तर शरपंजरीं पडून जीव दिला. ज्ञानेश्वराने नुसत्या योगसामर्थ्यावर न विसंबतां जिवंतपणीं समाधींत पुरून घेतलें. तुकारामाने नदीच्या डोहांत व रामतीर्थाने गंगेंत उडी घेतली. कुमारीलभट्टाने शंकराचार्यांच्या देखत जाळून घेतलें, आणि मानेगुरुजींने झोपेच्या गोळ्या खाऊन जीव दिला. हे सर्व इच्छा-मरणाचेच प्रकार! पांडवांचें व रामलक्ष्मणांचें हिमालयांतील मरण हेंहि इच्छामरणच होतें!! आणि इच्छामरण स्वीकारणाऱ्यांनी देहाचीच नव्हे तर आत्म्याची विटंबना होऊं दिली नाही. पण ज्यांनी इच्छामरण पत्करलें नाही, ते रोगांनी वा विटंबनेने मेले वा मारले गेले, त्यांतहि

श्रीकृष्ण, रामदास, रामकृष्णपरमहंस, अरविंद घोष ह्यांच्यासारखे गाढे तत्वज्ञानी वर सर्व भोंदू साधुसंत सांपडतात. देहाचा शेवट कसा करावा हें ठरविण्याचा हक्क ज्ञानेश्वराला होता, आणि त्याने तो योग्य वाटेल त्या दिशेने वजावला. त्यांच्या जवळच्या नातेवाईकांनी संमतीच नव्हे तर समाधी खणण्यास, दगडमाती लोटण्यास मदत दिली होती. टीकाकार सल्लामसलतीला हजर नव्हते, येवढेंच ज्ञानेश्वराचें दुर्दैव! दुसरें काय!! त्रिकालज्ञ ज्ञानेश्वराला टीकाकारांच्या शंकांचें निरसन करण्याचें चातुर्य सुचूं नये, अगर हजार वर्षे जिवंत समाधींत राहणाऱ्याला हाकेच्या अंतरावर 'पत्रिकेंत' चाललेला हलकल्लोळ ऐकूं येऊं नये, हेंहि दुर्दैवच!!

---

## ज्ञानदेवांची अकाली समाधि ( समारोप ) : : द. के. केळकर.

ज्ञानदेवांच्या अकाली समाधिविषयी मीं जी हुरहूर व्यक्त केली होती त्या हुरहुरी-विषयी चार विद्वानांनी आपले एतद्विषयक अभिप्राय व्यक्त केले आहेत. ज्ञानदेवाविषयीं सर्वां-नाच उत्कट आदर असल्याने चर्चा मोकळेपणाने झाली आहे. त्या चर्चेत उपस्थित झालेल्या कांही प्रश्नांविषयी माझे विचार थोडक्यांत मांडतों.

मीं माझ्या लेखांत जे प्रश्न उपस्थित केले होते ते असे :—

( १ ) ज्ञानदेव सिद्धयोगी होते तर त्यांनी इस्लामी आक्रमणाला तोंड देण्याकरिता आपल्या योगसामर्थ्याचा जनतेमध्ये उत्साह जागृत करण्यासाठी उपयोग कां केला नाही? ( २ ) ज्ञानदेवांनी ज्या रामदेवरावाचा उल्लेख केला आहे त्याच्या मस्तकावर हात ठेऊन त्याच्या ठिकाणीं इस्लामी आक्रमणाला तोंड देण्याचे सामर्थ्य कां जागृत केलें नाही? ( ३ ) ज्ञान-देवांना व्यक्तिशः कांही मिळवावयाचे राहिले नसले तरी तुकोबाच्या उक्तिप्रमाणे 'उपकारा' पुरतें राहून व 'गोष्टी सांगेन युक्तिच्या चार' या कृष्णाच्या उक्तिप्रमाणे रामदेवरावाला उत्थान देण्याची इच्छा त्यांना कां न वाटावी? 'विश्वचि माझें घर' मानणाऱ्या ज्ञानदेवांनी रामदेवरावाचा उल्लेखच केला नसता, अथवा माझी मराठी वैखरी अमृतालाहि जिंकेल व 'श्वासोच्छ्वास हि प्रबंध होआवे' असे बोल काढले नसते, किंवा सहाव्या अध्यायांत योग सामर्थ्याचें विस्तृत वर्णन केलें नसतें तर मीं जी अकाली समाधीची हुरहूर व्यक्त केली तिला अधिष्ठानच नसतें. मूळ गीतेंत नसतांहि 'देखोनि नास्तिकी नोंकिली। भक्तवृंदें ॥' हे जे ज्ञानदेवांनी उद्गार श्रीकृष्णाच्या तोंडीं घातले आहेत त्याच श्रीकृष्णाचें अनुकरण ज्ञानदेवांनी कां केलें नाही याची हुरहूर वाटली तर ती अनपेक्षित आहे का? आणि उद्या ॲटम बॉम्ब टाकलेले पाहत असतां 'हें विश्वाचे माझें घर' असें म्हणत योगिराज बसले तर आपणांस समाधान वाटेल का, असे प्रश्न मीं उपस्थित केले होते. या प्रश्नाचें उत्तर देण्यास, व खुलासा करण्यास एखादा सिद्धयोगीच पुढे आला पाहिजे. तोंपर्यंत ज्ञानदेवांनी वर्णिलेल्या योगसिद्धि या मर्यादित व काल्पित तर नाहीत ना अशी शंका मनाला टोचल्यावांचून राहत नाही. सहा महिने समाधि घेण्याइतकी ज्याची योग-विद्येंत प्रगति झाली आहे अशा एका योग्याच्या तोंडचें 'मी एक साधा माणूस, मी समाधि एवढीच क्रिया जाणतों' हे उद्गार मीं उध्दृत केले होते. अशाच प्रकारें इतर योगिराजांना विचारून याचा कांही खुलासा करतां येईल का हें पहावें, ही रुखरुख आजच्या ॲटमबॉम्ब-काळीं राहणारच. तरी योगवेत्त्यांनी याचा खुलासा करावा.

माझ्या सारख्याची हुरहूर कमी करण्याकरिता वरील मुद्यांना उद्देशून चर्चा व्हावयास हवी; पंडित दिवेकरशास्त्री यांनी 'जगद्व्यापारवर्ज्यं' या ब्रह्मसूत्राकडे माझें लक्ष वेधलें आहे. पण या सूत्राने, ज्ञानदेवाने योगसामर्थ्याचा उपयोग केला नाही तेंच योग्य होय, हा खुलासा कसा होतो ? त्या सूत्रांत सूत्रकाराला येवढेंच सांगावयाचें आहे की जगाची उत्पत्ति व लय अशा प्रकारचे व्यापार हे सृष्टिकर्त्याच्याच हातीं असून सगुणब्रह्मोपासनेने ईश्वरसायुज्य प्राप्त झाले-ल्यांनाहि त्यांत ढवळाढवळ करतां येत नाही. एरवीं, अणिमा, गरिमा वगैरे सिद्धींचा उपयोग करण्यास व्यत्यय नाही. शंकराचार्य लिहितात, 'जगदुत्पत्यादि व्यापारं वर्जयित्वा अन्यत् अणि-माद्यात्मकं ऐश्वर्यं मुक्तानां भवितुं अर्हति । जगद्व्यापारस्तु नित्यसिद्धस्यैव ईश्वरस्य ।' जगाच्या उत्पत्ति, लय वगैरे व्यापारांत योग्याला आपल्या सामर्थ्याचा उपयोग करतां येत नाही येवढेंच ब्रह्मसूत्रकार व शंकराचार्य सांगतात; पण आक्रमकांना तोंड देण्याकरिता जनतेचा उत्साह जागृत करण्यापुरताहि योगसामर्थ्याचा उपयोग करूं नये असा निष्कर्ष मला वाटते सूत्रांतून निघत नाही व भाष्यकारहि तसें प्रतिपादन करीत नाहीत. मुसलमानी आक्रमण हें कांही सृष्टीच्या उत्पत्ति-लयासारखे खास सृष्टिकर्त्याच्या अधिकारांतले प्रश्न नव्हेत. त्यांना तोंड देणें म्हणजे सृष्टीच्या मूलभूत नियमांत व्यत्यय आणणें कसें होतें ? शास्त्रीबोवांनी दुसरें सूत्र उध्दृत केलें आहे तें, 'यावदधिकारमवस्थितिः अधिकारिणाम्' त्यांत सूत्रकाराला असें प्रतिपादन करावयाचें आहे की, परमेश्वर ज्यांना कांही हेतूने जन्मास घालतो तो हेतु पुरा झाला की तो त्याला परत बोलावतो. शंकराचार्य हे सनत्कुमाराने स्कंदाचा अवतार घेतला "सनत्कुमारोऽपि स्कंदत्वेन प्रादुर्बभूव" । वगैरेचीं उदाहरणें देतात व शेवटीं सांगतात की, "तेषां लोकस्थितिहेतुषु अधिकारेषु नियुक्तानां अधिकारतंत्रत्वात् स्थितेः ।" सनत्कुमारासारख्या मुक्तांना पुन्हा जन्मास घातलें तें लोकस्थितिहेतुकरिता. आता याच न्यायाने परमेश्वराने ज्या लोकस्थिति-हेतूने ज्ञानदेवाला इहलोकीं पाठविला तो हेतु संपतांच त्याला परत बोलावला असें म्हटलें म्हणजे चर्चेचा विषयच संपुष्टांत येतो; कारण 'धाता यथापूर्वं अकल्पयत्' या न्यायाने जें जें झालें तें व्हावयाचें असा धात्याचा संकल्प मानला तर ज्ञानदेवाच्या अकाली समाधीबद्दल हुरहूर तरी कशास करावयाची ? पण सृष्टीची उत्पत्ति, लय व तिचे नियम हे परमेश्वराने विश्वाला घालून दिले असले तरी ते घालून दिल्यावर परमेश्वर शेषशायी होतो, नंतर ढवळाढवळ करीत नाही असें मानलें तर मात्र ज्ञानेश्वरांनी अकाली समाधि घेतल्याची हुरहूर मनाला टोचल्याशिवाय राहत नाही. 'धाता यथापूर्वं अकल्पयत्' हा पक्ष स्वीकारला म्हणजे विवेचनाला स्थानच उरत नाही.

'देहाचें घटक जें प्रारब्ध त्यामध्ये आक्रमकांच्या प्रतिकाराचे संस्कार नव्हते म्हणून ज्ञानदेव त्याकरिता ज्ञानोत्तर जगले नाहीत' असा आणखी एक मुद्दा शास्त्रीबोवानी पुढे मांडला आहे. असल्या गूढ विचारसरणीला मी उत्तर तरी काय देणार ? जें जें घडलें तें तें तसें घडावयाचें होतें, सर्व गोष्टी प्रारब्धाधीन असा पक्ष मांडला म्हणजे चर्चेला थाराच उरत नाही. पण मग पंडित दिवेकरशास्त्री यांनीच लिहिलेल्या 'आर्य संस्कृतीचा उत्कर्षापकर्ष' अशा ग्रंथांतील विवेचनाची सर्व बैठकच हादरून जाईल !

पंडितांनी दुसरा हवाला दिला आहे तो विद्यारण्याच्या पंचदशीचा. दिवेकरशास्त्री लिहितात, 'ज्ञान्याला सुद्धा स्वेच्छा, अनिच्छा, परेच्छा, प्रारब्धें भोगावीं लागतात असा सिद्धांत पंचदशीच्या दोन, चार, सात, नऊ प्रकरणांमध्ये विद्यारण्यांनी अट्टाहासाने मांडला आहे.' प्रारब्धावर भर दिला आणि ज्ञानेश्वरांनी प्रारब्धांत जेवढें कार्य होतें तेवढें केलें

असा पक्ष मांडला म्हणजे विचारसरणी खुंटलीच. मग जें जें झालें तें व्हावयाचेंच होतें असें समाधान मानून घेण्यापलीकडे विचाराला वावच उरत नाही. पंचदशीकाराकडे जें लक्ष वेधलें त्यानेंहि खुलासा होत नाही. दुसऱ्या अध्यायाच्या शेवटीं ब्राह्मी स्थितीचें वर्णन आहे. चौथ्या अध्यायांत काम, क्रोध वगैरे सोडून दे व निर्विकल्प समाधिस्थित होऊन मनोराज्य जिंकून टाक असा उपदेश आहे, तो निवृत्त योगिराजाला उद्देशून आहे; धर्म व भाषा यांचें रक्षण करणाऱ्या लोकजागृतिकार संतांना उद्देशून नव्हे. नामदेवानें ज्ञानदेवाच्या तोंडीं 'म्हणोनिया संतीं अवश्य आचरावें। जना दाखवावें वर्तोनिया" ही जी भाषा घातली आहे त्याचा एरवीं अर्थ काय? शास्त्रीबोवांनी पंचदशीच्या सातव्या अध्यायांतील ज्या श्लोकाचा उल्लेख केला आहे त्यांत म्हटलें आहे की, जग हें स्वप्नाप्रमाणें असल्याने त्यांत रंगून कोण जाईल? (स्वप्नेन्द्रजाल-सदृशं···कथं तत्र अनुरज्यति). पण ज्या स्वप्नांत अमृतातें पैजा जिंकणाऱ्या मराठी वैखरीचा ज्ञानदेव ज्या अभिमानाने उल्लेख करीत होते त्याच अभिमानाने स्वप्नांत कां होईना पण परकीय आक्रमणाविरुद्ध लोकजागृतीला त्यांनी कां वाहून घेतलें नाही, ही शंका बोचत राहतेच. शेवटीं पंचदशीच्या नवव्या अध्यायांतील श्लोकांनीहि समाधान होत नाही.'नैष्कर्म्येण न तस्य अर्थः' म्हणजे नैष्कर्म्याची अवस्था प्राप्त झालेल्याला स्वतःला कांही साधावयाचें नसतें हें स्पष्ट.पण तुकोबा म्हणतात त्याप्रमाणे 'राहिलों उपकारापुरता' ही दृष्टी कां स्वीकारूं नये? दिवेकरशास्त्री पुढे लिहितात, "ज्ञानेश्वर अणिमादि सामर्थ्यांचा उपयोग आक्रमकांच्या प्रतिकारार्थ करिते तर इस्लामचें आक्रमण नष्ट झालें असतें काय?" मीं या प्रश्नाला उद्देशूनच मुख्यतः लिहिलें व आजच्या परिस्थितीचा उल्लेख करून विचारलें की, "योग्यांचें सामर्थ्य कितीहि अचाट असलें तरी ते ॲटम बॉंबच्या हल्ल्याला तोंड देऊं शकतील काय? या प्रश्नाचें उत्तर योगविद्येतील तज्ज्ञच देऊं शकतील." या प्रश्नाचा खुलासा तज्ज्ञांनीच करावा अशी पुन्हा नम्रपणें विनंती करतों. असो.

प्रा. पंगू लिहितात, 'परकीय आक्रमणाला तोंड देण्याचें आवाक्याबाहेरचें असावें, यामुळे बहुधा ज्ञानेश्वरांनी समाधि घेतली असावी, येथपर्यंत केळकरांच्या विचाराची मजल गेली आहे. योग्याच्या सामर्थ्याबद्दल निश्चित कांहीच न सांगतां आल्यामुळे तज्ज्ञावरच हवाला दिला आहे.' योगसामर्थ्याबद्दल मला कांहीच निश्चित सांगतां येत नाही हें स्पष्ट आहे म्हणून तर तज्ज्ञांना विनंति केली. प्रा. पंगू पुढे लिहितात, 'जनतेला कर्तव्यप्रवण करण्याच्या उद्देशाने ज्ञानेश्वरी रचिली हें सिद्ध होण्यासारखें नाही.' मग रामदेवरावाचा उल्लेख केला कशाला? त्याचें समाधानकारक उत्तर नसल्याने तो उल्लेख 'अर्थवादात्मक किंवा प्रक्षिप्त मानल्याशिवाय विसंगतीचें स्पष्टीकरण होत नाहीं' असा खुलासा प्रा. पंगूच करतात. तेव्हा विसंगति त्यांना मान्य करावी लागलीच असल्याने अधिक चर्चेची आवश्यकता उरत नाही. 'दुरितांचें तिमिर जावो। विश्व स्वधर्मसूर्यें पाहो। जो जें वांछील तो तें लाहो। प्राणिजात॥' असेच उद्गार ज्ञानेश्वरीच्या समारोपांत आढळतात ना? मग ज्ञानदेवाने जनताधेवेच्या पायीं आपल्या योगविद्येला वाहिलें नाही ही रुखरुख कां न रहावी? प्रा. पंगूंनाहि ज्ञानदेवांच्या अकाली समाधिबद्दल थोड्या निराळ्या कारणाकरिता का होईना पण रुखरुख लागून राहिलेली आहेच. ते लिहितात, 'ज्ञानेश्वरीसारख्या आणखी एखाद्या ग्रंथाचा ठेवा आम्हांला न देतां इहलोकाचा त्याग करण्याचा निर्णय घ्यावा ही घटना मलाच काय पण कोणाहि भावनाप्रधान व्यक्तीला रुखरुख लावणारी आहे.' म्हणजे अन्य कारणाकरिता का होईना ज्ञानदेवांची समाधि अकाली होती याची रुखरुख प्रा. पंगूंनाहि लागतेच!

दिवाणबहादुर राजरत्न वा. वि. जोशी यांनी 'ज्ञानेदवाची आत्महत्या' अशा मथळ्याखाली आपले विचार मांडले आहेत. ते लिहितात, "रोगराईनी थोर थोर महात्मे जमीनदोस्त झाले तसा ज्ञानेश्वर जमीनदोस्त झाला नाही ह्याबद्दल त्यांना (केळकरांना) रुखरुख वाटत असावी." ह्या पद्धतीने चर्चा चालावयाची असल्यास त्याला उत्तर काय देणार ? "आत्महत्येचा प्रयत्न करणें हा नवीनच गुन्हा पीनलकोडाने ठरविल्यापासून इच्छामरण ग्रह्य वाटूं लागलें येवढेंच." असा खुलासा दिवाणबहादूर करतात. इच्छामरणीं ज्ञानेश्वरांनी त्यांना योग्य वाटलें तेंच केलें पण वाचकाला रुखरुख लागत असेल तर ती त्याने दडपून कां टाकावी ? या रुखरुखीपाठीमागे योगसामर्थ्याच्या मर्यादेचा खुलासा तज्ज्ञांनी करावा ही अपेक्षा आहे हें पुन्हा एकदा नमूद करतों.

सौ. सुमति पोंक्षे लिहितात, "प्रत्येक जीवमात्राचा एक विशिष्ट जीवितहेतु असतो. तेवढें कार्य संपतांच जागा खाली करून देणें हा सृष्टीचा नियम आहे." ज्ञानेश्वराच्या समाधीला सृष्टीचा नियम कसा लागूं पडतो याचें मला तरी आकलन करतां येत नाही. परकीय आक्रमणाला तोंड देण्याकरितां झगडणें म्हणजे सृष्टिवर मात करणे असा पक्ष मांडणें योग्य होईल कां ? आणि अणिमा, गरिमा वगैरे योगसिद्धि वापरणें म्हणजेहि ईश्वरी संकेताविरुद्ध जाणे नव्हे; अशा प्रकारच्या शंकराचार्यांनी केलेल्या खुलाशाचा उल्लेख वर केलाच आहे. निसर्गाच्या हातांतील बाहुलें जो मानव त्याने सृष्टिनियमांवर मात करावी ही अपेक्षाच अवास्तव नव्हे काय ?

"ज्ञानेश्वर समाजधारणेविषयी जागरूक होते म्हणूनच त्यांनी सृष्टिनियमांविरुद्ध बंड पुकारण्याची शिकवण लोकांना दिली नाही." असा त्या खुलासा करतात. म्हणजे योगसामर्थ्याचा उपयोग करणें हें सृष्टिविरुद्ध बंड होय असें समजावयाचें का ? या बाबतींत तज्ज्ञांनी योग्य खुलासा करावा. शंकराचार्यांचें तरी तसें मत नाही हें मी वर दाखविलेंच आहे. पुढें त्या लिहितात कीं "भवितव्यतेचा ओघ आटवणें श्रीकृष्णालासुद्धा शक्य झालें नव्हतें......कारण येवढेंच दिसतें कीं कालचित्रपटांतील सर्व दृश्यें अगोदरच नियोजित असावींत." सर्वच घटना आधींच नियोजित असतात असा पक्ष मांडला म्हणजे चर्चेला क्षेत्रच उरत नाही.

शेवटीं ॲटम बॉम्बला तोंड देण्याचें सामर्थ्य योगविद्येला साध्य आहे का, याचा खुलासा तज्ज्ञांनी करावा असें पुनश्च नम्रपणें विचारून येथें थांबतों.

---

एकांतांत बसला आहे; स्वच्छ उदकाप्रमाणें किंवा आरशाप्रमाणें मनाचें दर्पण पुढे मांडिलें आहे, आणि त्यांत प्रतिबिंबित झालेल्या विचारांचें व कल्पनांचें हुबेहुब स्वरूप अवलोकन करीत आहे; अशा वेळीं एखाद्या आगंतुक विचाराचें प्रतिबिंब त्या दर्पणांत पडूं देऊन त्याच्या रूपाची व आकाराची इतरांच्या रूपाशीं व आकाराशीं तुलना करण्यास भीति कशासाठी वाटावी ? अभ्यासाच्या खोलीचें दार लावून घेऊन मनाच्या कपाटाचीं दारें खुलीं टाकण्यास व त्यांतून पाहिजे त्या विचारांस बाहेर पडूं देण्यास व पाहिजे त्यांस आंत शिरूं देण्यास ज्याची छाती होत नाही तो मनुष्य कुचक्या कसपटापेक्षाहि नादान होय असें म्हणण्यास हरकत नाही. पण असलेच मनुष्य जगाच्या सांप्रत स्थितींत जेथे तेथे फार आढळतातः निदान हिंदुस्थानांत तरी ते असावे त्यापेक्षा फार फाजील आहेत; आणि हा फाजीलपणाच आमच्या चिरकालीन दैन्यावस्थेस आद्य कारण झाला आहे."

—गोपाळ गणेश आगरकर.

अनुक्रमणिका

## ' उपजाति ' वृत्ताचें लक्षण काय ? : : वि. ज. सहस्रबुद्धे.

के० गोडबोले यांचें ' वृत्तदर्पण ' अभ्यासू दृष्टीने पहात असतां ' उपजाति ' वृत्तासंबंधी शंका उद्‌भवली, म्हणून तिचा थोडा विचार करावा लागला. तो विचार येथे देणार आहे.

वृत्तदर्पणांत ' उपजाति ' वृत्ताचें लक्षण दिलेलें आहे तें असें—

॥ जेव्हां दिसे मिश्रण इंद्रवज्रा ॥ ॥ ह्यांचे पदीं आणि उपेंद्रवज्रा ॥

॥ तेव्हां म्हणावें उपजाति तीला ॥ ॥ पतीच हें दैवत हो सतीला ॥

या लक्षणावर टीप दिली आहे. तीच महत्त्वाची आहे. ती टीप या खाली उद्‌धृत करितों.

"इंद्रवज्रा व उपेंद्रवज्रा यांच्या मिश्रणाला ज्याप्रमाणे उपजाति हें नांव देतात, त्याप्रमाणे कोणत्याहि दोन अथवा तीन वृत्तांच्या मिश्रणाला उपजाति हेंच नांव देतात. यास प्रमाण पिंगल छन्दःसूत्राचेंच आहे. उदाहरण, श्येनिका, कामदा, ललित, शुद्धकामदा, इत्यादि किंचित् भेद असलेल्या वृत्तांचें मिश्रण पुढे दिलेल्या पद्यांत आहे.

चरणांतील अक्षर—संख्या.

१ ॥ युद्ध तें कधी तुम्ही दुणावलें ॥ (११) ॥ म्हणुनि राघवें तुम्हाधि धाडिलें ॥ (१२)
॥ भ्याड ते तुम्ही ठाउकें मला ॥ (१०) ॥ व्यर्थ नाम शत्रुघ्न हें तुला ॥ (१०)
२ ॥ एक जाउनी सांगती सिते ॥ (१०) ॥ मांडिला अनर्थ तूझिया सुतें ॥ (११)
॥ कर्दळी वनीं अश्व बांधिला ॥ (१०) ॥ त्या निमित्त सैन्यभार लोटला ॥ (११)

यांपैकी पहिल्या पद्यांत ललित, शुद्धकामदा व कामदा यांचें मिश्रण आहे व दुसऱ्या पद्यांत श्येनिका व कामदा यांचें मिश्रण आहे. अर्थात् हीं उपजातीचींच उदाहरणें होत."

याप्रमाणे टीपेंतील खुलासा आहे. येथे शंका अशी येत आहे की, उपजातीच्या प्रत्येक चरणांत अक्षर—संख्या समान असण्याची आवश्यकता मानावी की नाही? अक्षर—संख्या सारखी असून अक्षरगण भिन्न असले तर चालूं शकतील. परंतु टीपेंत जीं दोन पद्यें दिलीं आहेत, त्या पद्यांच्या चरणांत अक्षरसंख्या सारखी दिसत नाही. तेव्हा टीपेमधील पद्यें उपजाति वृत्ताचीं ठरतील काय?

वृत्तदर्पणकारांनी पिंगल—छन्दःसूत्राचा आधार दिला आहे. यासाठी तें सूत्र पाहिलें तर तें असें आढळून येतें.

आद्यन्तावुपजातयः ॥ ६।१७ ॥

यावर वृत्तिकाराचें म्हणणें—

" आद्यन्तौ—इति अनन्तरोक्तौ इंद्रवज्रोपेंद्रवज्रयोःपादावाह । तौ यदा विकल्पेन यथेष्टं भवतस्तदा उपजातयः प्रस्तारवशात् चतुर्दश प्रकारा जायन्ते । "

या उपजातिसंबंधी पुढे निर्णय दिला आहे की,—

" समाक्षरजातिद्वयमिश्रणम् एव उपजातित्वम् इति प्राचाम् मतम् एव निर्बाधम् "

" समाक्षरयोः द्वयोः मिश्रणम् एवं उपजातित्वम् इति युक्तम् "

वरीलप्रमाणे पिंगल—छन्दःसूत्राच्या आधारावरून माहिती मिळते. तिचा विचार केला तर वृत्तदर्पणकारांनी जी टीप दिली आहे, ती गैरलागू दिसते. उपजातीच्या लक्षणामध्ये समाक्षर चरणांची आवश्यकता वृत्तदर्पकारांना अभिप्रेत नाही, असें समजणें भाग आहे.

अनुक्रमणिका

प्रो. माधवराव पटवर्धन यांनी छन्दोरचनेंत इंद्रवंशा व वंशस्थ मिळून होणाऱ्या 'शिशिरा' या वृत्तास अर्धसमवृत्त म्हणून उल्लेखिलें आहे. उपजाति म्हणजे दोन वृत्तांचें मिश्रण होय. हें मिश्रण समाक्षरक वृत्तांचें, वर्गबांधवांचें असावें असेंहि माधवराव यांनी म्हटलें आहे. ( छन्दोरचना पान २३. ) परंतु इंद्रवंशा व वंशस्थ, या समाक्षरक वृत्तांच्या मिश्रणास 'उपजाति' समजण्याऐवजी ते अर्धसमवृत्त म्हणतात. यामुळे शंकेस जागा राहिली आहे.

प्राकृत-पिंगल सूत्र ११९ यांत "समजातौ समानि एव अक्षराणि देहि पिंगलो भणति । एवम् उपजातिं कुरु ।" असें नमूद आहे. त्यावरून समाक्षरक चरण पाहिजेत या नियमास बळकटी येत आहे. प्रा. रा. श्री. जोग यांनी अभिनव काव्यप्रकाश (पान ३३४) यांत उपजाति वृत्तामध्ये अक्षरसंख्या सर्व चरणांत सारखी असावी असाच अभिप्राय व्यक्त केला आहे. श्री. साधुदास हे उपजातिविषयीं काय म्हणतात तेंहि येथे देण्यास हरकत नाही. त्यांनी म्हटलें आहे—

"सजातीय वृत्तांच्या जोडीचें मिश्रण करून उपजाति करण्याची वहिवाट संस्कृत-कवींनी पाडली असून ती मराठी कवींनीहि प्रचारांत आणली आहे. इंद्रवज्रा-उपेंद्रवज्रा, वंशस्थ-इंद्रवंशा, स्वागता-रथोद्धता, असंबाधा-मध्यक्षामा, इत्यादि जोड्या असें मिश्रण करावयास चांगल्या आहेत." ( मराठीची सजावट. भाग २, पान ५४. )

साधुदासांनी 'सजातीय वृत्तांची जोडी' असे शब्द वापरले आहेत. यांपैकी 'सजातीय' या शब्दाचा अर्थ नीट कळत नाही. तसेंच 'जोडी' या शब्दाविषयीहि शंका उत्पन्न होते. समाक्षरक दोन वृत्तांचें मिश्रण, इतकेंच केवळ मानून चालणार नाही. समाक्षरक असणाऱ्या दोन, तीन वा चार वृत्तांचें मिश्रण करूनहि उपजाति वृत्त बनवितां येईल असें वाटतें. भगवद्‌गीतेंतील एक श्लोक उदाहरणादाखल पुढे देतों, त्यावरून कल्पना येईल.

॥ अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः ॥ ॥ सर्वे सहैवावनिपालसंघैः ॥
॥ भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथासौ ॥ ॥ सहास्मदीयैरपि योधमुख्यैः ॥

या श्लोकामध्ये चारी चरणांत अक्षरसंख्या अकराच म्हणजे एकसारखी असून लगक्रम प्रत्येक चरणांत वेगवेगळा आहे.

असो. याप्रमाणे निरनिराळीं मतें दिलीं आहेत. त्या सर्वांचा विचार केला असतां वृत्तदर्पणांतील टीप चुकीचीच म्हणावी लागते. उपजाति वृत्तांतील सर्व चरण समाक्षरक पाहिजेत ही गोष्ट ग्रहीत धरणें योग्यच होईल. परंतु इतकें मान्य केलें तरी पुनः एक शंका उद्भवूं शकते ती ही की, केवळ समाक्षरक चरण असून भागणार नाही. तर त्यांशिवाय आणखी कांही पाहिजे की काय? अशी शंका असल्याने तिच्या स्पष्टीकरणाकरिता एक श्लोक येथे देत आहे. भुजंगप्रयात व द्रुतविलंबित या वृत्तांचे चरण प्रत्येकीं बारा अक्षरांचे आहेत. तेव्हा यांचें मिश्रण केल्यास तें उपजाति वृत्ताचें उदाहरण साहजिकच ठरेल. 'मना सज्जना भक्तिपंथेंचि जावें' या श्लोकांतील दोन चरण मूळचे कायम ठेवून बाकी दोन चरण, त्याच अर्थाचे द्रुतविलंबित वृत्तांत रचून हा श्लोक केला आहे.

॥ मना सज्जना भक्तिपंथें चि जावें ॥ ॥ तरि करील कृपा सहजीं हरी ॥
॥ जनीं निंद्य तें कर्म सोडून द्यावें ॥ ॥ जगतिं वंद्य असे नित तें करी ॥१॥

हा श्लोक उपजाति वृत्ताचा समजण्यास हरकत येणार नाही हें खरें आहे. तथापि हा श्लोक प्रत्यक्ष म्हणतांना नीट जमल्यासारखें वाटत नाही, म्हणावयास अवघड होतें व दोन भिन्न धाटणींचें मिश्रण श्रवणाला गोडहि लागत नाही, असें वाचकांच्या अनुभवास येईल.

यावरून आता असें ठरविणें प्राप्त आहे की, उपजातीचे चरण केवळ समाक्षरक असून भागत नाहीं, तर चरणांतील 'यति' व चरण म्हणण्याची धाटणी यांमध्ये बरेंचसें साम्यहि असणें आवश्यक मानावें लागणार आहे. प्रा. रा. श्री. जोग यांनी या बाबतींत आपलें मत देतांना 'अक्षरसंख्या सारखी असणें' एवढेंच लक्षण सांगून थांबले नाहीत, ते आणखी असेंहि सांगतात कीं, 'यति असल्यास तीहि सारख्याच स्थानीं असावी, फक्त एखाद्या स्थानांतील अक्षर लघु वा गुरु (वेगळें) असलें तरी गेयतेंत सामान्य वाचकास लक्षांत येईल असा फरक होत नाही अशी स्थिति असल्यास तो उपजाति प्रकार होतो.' तेव्हा हें प्रा. जोगांचें मत विचाराई आहे असें मला निश्चित वाटतें.

वृत्तदर्पणांतील टीपेचा विचार करितां टीपेंतील पद्यांपैकी दुसरें पद्य (एक जाउनी सांगती सिते) अर्धसमवृत्तांतील मानतां येईल; परंतु पहिलें पद्य (युद्ध तें कधीं तुम्ही दुणावलें) उपजाति नव्हे, अर्धसमवृत्तहि नव्हे, अशा प्रकारचें दिसून येतें.

मिश्रणाच्या तुलनेसाठी एक उदाहरण देतों. 'हरिणप्लुता' हें अर्ध-समवृत्त आहे. त्याचा खुलासा करतांना छन्दोरचनेंत (पान ३२६) माधवराव यांनी असें दाखवून दिलें आहे की, 'हरिणप्लुता'चा पाहिला व तिसरा हे चरण 'विदुषी' या वृत्ताचे असून दुसरा व चौथा हे चरण 'द्रुतविलंबित' ह्यां वृत्ताचे आहेत. म्हणजे विदुषी व द्रुतविलंबित या दोन वृत्तांचें मिश्रण 'हरिणप्लुता'मध्ये आहे. पाहाः—

॥ रुचिभेद नरांत पहा कसा ॥ ॥ जरि वसे रसिकांमधि बन्धुता ॥
॥ रुचते करिणीच मदालसा ॥ ॥ तर कुणा तरला हरिणीप्लुता ॥ १ ॥

हें मिश्रण श्रवणमधुर असल्याने इष्ट वाटतें. परंतु भुजंगप्रयात व द्रुतविलंबित यांचें मिश्रण, त्या वृत्तांची अक्षरसंख्या सारखी असूनहि म्हणण्याला सोयीचें वाटत नाही व गोड लागत नाहीं. ही गोष्ट तुलनेच्या दृष्टीने लक्षांत घेण्यासारखी असल्याने नजरेस आणली आहे.

असो. उपजाति वृत्ताच्या लक्षणासंबंधीं प्रश्न उद्भवल्याने त्याविषयी विचार केला असतां जें कांही आढळून आलें त्याची चर्चा येथवर केली आहे. उपजातीचें निश्चित लक्षण ठरलेलें दिसत नाही. जें लक्षण उपलब्ध आहे तें मोघम आहे. तेव्हा याबाबत कांहीं निर्णय ठरवितां येणें शक्य असल्यास तो छन्दःशास्त्रज्ञांनी ठरवावा इतकीच त्यांना नम्र विनंती आहे.

टीपः—पद्याचे वृत्त आणि जाति असे मुख्य दोन भेद आहेत. तेव्हां 'उपजाति' यांतील 'जाति' हा शब्द योग्य वाटत नाहीं. कारण जाति म्हणजे मात्रा संख्याक पद्य, असा विशिष्ट अर्थ आहे. (जातिर्मात्रा कृता भवेत्) त्या दृष्टीने 'उपजाति' याचा अर्थ निराळा होऊं शकतो. जातींचा मिश्र प्रकार म्हणजे 'उपजाति' होय. उदाहरणार्थ—

१ ॥ सायंकाळीं एके मेळीं द्विजगण अवघे वृक्षीं ॥ मात्रा २८, साकी चरण
॥ अरुणोदय होतांचि उडाले चरावया पक्षी ॥ मात्रा २६, चंद्रकांत चरण

२ ॥ आश्रम हारिणि गडे तुला हें वृत्त काय कळलें ॥ मात्रा २६, चंद्रकान्त
॥ आश्रम सोडुनि वनास वळती गुरुजींची पाउलें ॥ मात्रा २७, सूर्यकान्त

(कवि पु. ल. देशपांडे)

अशीं उदाहरणें आणखीहि मिळतील. तेव्हां वरील प्रकारच्या मिश्रणास 'उपजाति' या नांवानें संबोधणें अधिक अन्वर्थक ठरणार नाहीं काय?

---

# वामनी (?) गंगालहरीचा खरा कर्ता—'सखा' कवि :

सदाशिव लक्ष्मीधर कात्रे

जगन्नाथपंडितांच्या संस्कृत गङ्गालहरीची एक जुनी मराठी समश्लोकी[1] वामनपंडित-कृत म्हणून प्रसिद्ध आहे. शक १७७३ =इ. १८५१ मधे मुंबईच्या ज्ञानदर्पण मुद्रणालयांतून निघालेलें एक शिळा–मुद्रण हेंच हिचें प्रथम प्रकाशित संस्करण असावें असें श्री. शं. ग. दाते यांच्या मराठी-ग्रंथ-सूचींत समाविष्ट[2] झालेल्या निर्देशांवरून वाटतें. त्यानंतर वामनी कविता-संग्रहाच्या ओघांत आणि, संस्कृत मूळासह किंवा तद्विरहित, स्वतंत्र ग्रंथाच्या स्वरूपांत ही सम-श्लोकी आजपावेतों अनेक ठिकाणांहून अनेकदा मुद्रित झाली आहे. इ. १९०१ मधे काव्य-संग्रह सं. ३३ द्वारें प्रकाशित झालेल्या वामन पंडितकृत कविता संग्रह भाग ३ मधे हिचा समावेश करतांना कै. वा. दा. ओक यांनी पुढे दिल्याप्रमाणे टीप दिली आहे[3]— "......आमच्या वामनपंडितांनी या संस्कृत वधूस मराठी पोषाख चढवितांना रसहानि किंवा पदहानि बिलकूल होऊं दिली नाही व जगन्नाथरायांचें हुद्गत उत्कृष्ट तऱ्हेने बाहेर आणलें आहे. एकंदरींत हें उत्कृष्ट भाषान्तर सर्व भाविक व रसिक लोकांच्या आदरास पात्र व्हावें असेंच झालें आहे." कै. वि. ल. भावे यांनीहि महाराष्ट्र-सारस्वतांत या समश्लोकीच्या उत्कृष्टपणाबद्दल वामनपंडितांना असेंच प्रशस्तिपत्र दिलें आहे.[4] एकूण, ही समश्लोकी महाराष्ट्रां-तील आणि बृहन्महाराष्ट्रांतील केवळ भाविक रसिकांच्याच नव्हे तर चिकित्सकांच्याहि परम आदरास पात्र झालेली आहे.

## वामनकर्तृकत्वास पुराव्याचा अभाव.

पण या समश्लोकीचें तथाकथित वामनपंडितकर्तृकत्व सिद्ध करूं शकणारा कोणताच पुरावा अद्याप तरी उजेडांत आलेला दिसत नाही. हिच्या जुन्या हस्तलिखितांवर कर्ता म्हणून वामन हें नांव निर्दिष्ट झालेलें संशोधकांस आढळलेलें नाही. तसेंच, वामनपंडितांच्या निर्वि-वाद कृतींतून दृग्गोचर होणारीं भाषा, रचना, इत्यादिकांचीं वैशिष्ट्यें कांही तज्ज्ञांच्या मतें या समश्लोकींत नाहीत. कै. वा. अ. भिडे यांनी सरस्वती–मंदिरांतून इ. स. १९०५ मधे प्रसिद्ध केलेल्या वामनपंडित या विस्तृत टीका-प्रबंधांत पुराव्याविना वामनपंडितांच्या नांवांवर प्रचलित केल्या गेलेल्या अनेक कृतींविषयी चिकित्सापूर्ण ऊहापोह करून "गंगालहरी व भर्तृहरींचीं शतकें यथार्थदीपिकाकारांचीं किंवा कोणत्याहि वामन कवीचीं आहेत असें म्हणण्यास तिळमात्रहि आधार नाही" असें स्पष्ट विधान केलें आहे.[5] इतर कित्येक वादग्रस्त

---

१. या समश्लोकीचा कर्ता वामन नसल्याचा निष्कर्ष या लेखांत घेतला असला तरी तिला सोईसाठे म्हणून 'वामनी' असेंच संबोधणें भाग झालें आहे.

२. पृ. १६२ इ.

३. १९११ आवृत्ति, पृ. ११८.

४. शक १८७३ संस्करण, पृ. ४७४–५.

५. पृ. ५६.

अनुक्रमणिका

कृतींप्रमाणे ही गंगालहरी-समश्लोकीहि केवळ तिच्या श्लोकबद्धतेमुळे किंवा तिची एखादी जुनी प्रत मूळ संपादकास इतर वामनी प्रकरणांसमवेत एकाच बाडांत किंवा दप्तरांत सापडल्यामुळे वामनपंडितांच्या नांवावर दडपली गेली असें कांही संशोधकांचें अनुमान आहे.

विरुद्ध अन्तःस्थ पुरावा.

ही समश्लोकी प्रख्यात वामन पंडितांहून बरीच नंतरची असावी असें दाखवूं शकणारीं कांही अंतःस्थ गमकें अलीकडेच माझ्या लक्ष्यांत आलीं आहेत. जगन्नाथपंडितांच्या साहित्यसेवेचा काळ ठोकळ मानानें इ. १६२० ते १६६० आहे.[1] वामनपंडितांच्या बहुसंख्य ग्रंथांपैकी निगमसार हा ग्रंथ शके १५९५=इ० १६७३ या वर्षी रचिला गेला असा त्यांतच स्पष्ट निर्देश आहे. म्हणजे हे दोघे पंडित वयाच्या थोड्याफार भेदाने प्रायः परस्पर समकालिक होते हें उघड आहे. वामनपंडितासारख्या उच्च श्रेणीच्या मराठी कवीने जगन्नाथपंडितासारख्या प्रथितयश समकालिक संस्कृत कवीची कृति अनुवादितांना तिचे मौलिक पाठच समोर ठेवणें संभाव्य आहे. तिच्या मूळ रचनाकाळापासून शे-सवाशे वर्षांनंतर प्रचारांत आलेले विसंगत अपपाठ त्याने आधारभूत म्हणून घेण्याची शक्यता अर्थातच नाही. राघवकवि उपाख्य रघुनाथपंडित मनोहर चंपावतकर यांच्या साहित्यसेवेचा काळ स्थूल मानाने इ. १६५५ ते १७१० असा निर्धारितां येतो. अर्थात् तेसुद्धा वरील पंडितद्वयाचे वयाने कनिष्ठ असे समकालिक किंवा किंचित् नंतरचे. त्यांनी रचिलेल्या नि अद्याप अप्रकाशित असलेल्या एका निराळ्या गंगालहरी–समश्लोकीची मुद्रणार्थ प्रत चार जुन्या हस्तलिखितांच्या आधाराने सज्ज करण्याच्या उद्योगांत मी असतां माझ्या असें लक्ष्यांत आलें की सध्या प्रचलित असलेल्या संस्कृत गङ्गालहरीच्या पाठसंहितेंत नंतरचे कित्येक अपपाठ अन्तर्भूत झालेले असून त्या स्थळांत राघवकवीने स्वीकारलेले पाठ हेच मौलिक नि सर्व दृष्टींनी प्रशस्यतम असे आहेत. त्यानंतर मी संस्कृत गङ्गालहरीच्या असंख्य हस्तलिखितांचें बारकाईने निरीक्षण केलें तेव्हा राघवकवीने स्वीकारलेले पाठच प्राचीनतर हस्तलिखितांतील संहितेंत अन्तर्भूत असल्याचें मला दिसून आलें. पण यांपैकी दोन ठळक ठिकाणांत दलपतिरामाने संवत् १८६४=इ. १८०७ मधे रचिलेल्या संस्कृत टीकेंत स्वीकारलेले अपपाठच वामनी गंगालहरींत अनुवादिलेले दिसतात !

(१) श्लोक ५:—स्मृतिं याता पुंसामकृतसुकृतानामपि च या
हरत्यन्तस्तन्द्रां तिमिरमिव चन्द्रांशुसरणिः ।
इयं सा ते मूर्तिः सकलसुरसंसेव्यसलिला
ममान्तःसंतापं त्रिविधमपि पापं च हरताम् ॥

येथे दुसऱ्या चरणांतील ' चन्द्रांशुसरणिः ' या मूळ पाठाच्या जागीं पुढे ' चण्डांशुसरणिः ' हा अपपाठ प्रचलित झाला. तोच

न केलें सत्कर्माचरण असियांनीहि भजतां
तयांच्या जाड्यातें हरिशि तिमिरां जेंवि सविता ।
अशी तूझी ते हे तनु सुरगणां सेव्य सकळां
त्रिधा पापा माझा अणिक हरु संताप सगळा ॥

या वामनी अनुवादांत स्वीकारलेला दिसतो. या श्लोकाची राघवी समश्लोकी पुढीलप्रमाणे आहे–

१. पां. वा. काणे—हिस्ट्री ऑफ संस्कृत पोएटिक्स (१९५१), पृ. ३१२.

न केल्या पुण्येंही स्मरण करितां आळस हरी
जशा चन्द्र ध्वान्ता उदयगत होतां दुरि करी ।
अशी मूर्ती तूझी सकळ सुर तोयास पुजिती
हरो मत्संताप त्रिविध आणि हे पापसमिति ॥

प्राचीनतर हस्तलिखितांचा नि राघवी समश्लोकीचा आधार, अनुप्रास, औचित्य ( गंगेचें शान्त-शीतलत्व ), अर्थान्वितत्व, इ. सर्व दृष्टींनी ' चन्द्रांशुसरणिः ' हाच पाठ मौलिक दिसतो. त्याच्या जागीं ' चण्डांशुसरणिः ' या मागाहूनच्या अपपाठास वामनी समश्लोकींत मिळालेला आश्रय त्या समश्लोकीच्या काळावर बोलका प्रकाश पाडतो.

( २ ) श्लोक १०:—न यत्साक्षाद्वेदैरपि गलितभेदैरवसित
न यस्मिञ्जीवानां प्रसरति मनोवागवसरः ।
निराकारं नित्यं निजमहिमनिर्वासिततमो
विशुद्धं यत्तत्त्वं सुरतटिनि तत्त्वं न विशयः ॥

येथे चवथ्या चरणांतील ' विशयः ' ( = संशयः ) हा शब्द बराच अपरिचित असल्यानें त्यांत नंतरच्या अल्पश्रुत पोथीलेखकांस आणि असमीक्षक संस्कृत टीकाकारांस लेखनप्रमाद भासला नि त्यांच्या दृष्टीने शुद्ध असा ' विषयः ' हा सध्या चालू असलेला नवीन पाठ तयार झाला ! परंतु ' विषयः ' ( = इन्द्रियोपभोग्यः पदार्थः ) हा पाठ येथे चालू वाक्यार्थाच्या ओघांत मुळींच जुळत नाही आणि सदाशिव, दलपतिराम, इ. संस्कृत टीकाकारांनी प्रस्तुत संदर्भांत त्याचा अर्थ जमविण्यासाठी केलेली धडपड अगदी निष्फळ वाटते ! या श्लोकाचा राघवी अनुवाद दोन हस्तलिखितांच्या अनुसारें—

ज्ञानकाण्ड वेदांनी अम्बे ! साक्षात् जयास ना कथिलें ।
ज्यामध्यें जीवांचा वाक्चित्ताचा विचार ही न चले ॥
निजतेजें अज्ञाना निरसी, आकार ही जयास नसे ।
शुद्ध तत्त्व ऐसें जें, तें तूं; संदेह यांत नाच वसे ॥

असा दोन आर्यांत असून इतर दोन हस्तलिखितांच्या अनुसारें तो

न जें साक्षात् मानें निगमवरशब्दीं निरविलें
मनुष्याचा वाचाप्रसरहि जयामाजि न चले ।
स्वतेजें अज्ञाना दमुनि परि जें शून्य विलसे
असें तें तूं तत्त्व; त्रिपथगमने ! संशय नसे ॥

असा समवृत्त श्लोकांत आहे. श्लोक ४३ चा राघवी अनुवाद देतांनाहि हीं जुनीं हस्तलिखितें अशीच परस्पर-भिन्नता दाखवितात. या प्रकारासंबंधाने माझी अशी समजूत झाली आहे की या स्थळांचे हे दोनहि वृत्तांतील अनुवाद स्वतः राघवकवीचेच असून त्यांपैकी एक त्याने चालचलाऊ स्वरूपांत घाईघाईने प्रथम रचिला असावा आणि पुढे स्वकृतीचें स्वस्थतेने समीक्षण करतेवेळीं तो त्याने कांही त्रुटीस्तव निरस्त करून त्याच्या जागीं दुसरा भिन्न वृत्तांत रचिला असावा. वास्तविक प्रकार कांही असला तरी राघवकवीपुढे मूळांतील ' विशयः ' हाच पाठ असल्याचें वर उध्दृत केलेल्या दोनहि अनुवादांतील ' संदेह ', ' संशय ' या शब्दांवरून निर्विवादपणें सिद्ध होतें. या दृष्टीने सूक्ष्म निरीक्षण चालविलें असतां संस्कृत गङ्गालहरीच्या

कांही हस्तलिखितांतहि ' विशयः ' हा पाठ मला नंतर सापडला. यांपैकी एका हस्तलिखितांत तर मूलतः लिहिलेला ' विशयः ' हा पाठ नंतर निरस्त होऊन त्याच्या जागीं ' विषयः ' हा पाठ मागाहून कोणी तरी चढवून दिला असल्याचा प्रकारहि स्पष्टपणें लक्ष्यांत येतो ! श्लोक १० व्या--

दिसे ना जें वेदां गतनिखिलभेदांसि नयनीं
न जेथे जीवांची प्रसरति मनोवाक्यकरणी ।
अकारानाशांते त्यजुनि निजरूपीं विकसनें
जया तत्त्वा तें तूं; विषय म्हणती मूढ मतिने ॥

या वामनी अनुवादांत मागाहूनचा विसंगत अपपाठच सरळपणें स्वीकारलेला दिसतो !

## वामनपंडित कर्ता असणें अशक्य!

मूळ गङ्गालहरींत दिसणारे हे अपपाठ जगन्नाथपंडितांच्या निधनानंतर पुष्कळ वर्षांनी प्रचलित झाले असावेत आणि प्रायः समकालिक अशा वामनपंडितांकडून ते स्वीकारले जाण्याची शक्यता मुळींच नाही. अर्थात् ही तथाकथित वामनी समश्लोकी बरीच अर्वाचीन असावी हें स्पष्ट होतें.

या प्रकारें या समश्लोकीच्या वामनकर्तृकत्वाचा निरास निश्चितपणें झाला तरी तिचा खरा कर्ता कोण हा महत्त्वाचा प्रश्न उरतोच, या दिशेनेहि संशोधनास विधायक गति देणारें एक संपन्न साधन आज सुदैवानें उपलब्ध होत आहे.

## नवीन साधनानें शोध.

उज्जयिनीच्या सिन्दिया ओरिएन्टल इन्स्टिट्यूटच्या हस्तलिखितग्रंथालयांत संस्कृत मूळासह ही समश्लोकी असलेली एक संपूर्ण प्रत ( आवक क्रमांक ६२३३ ) आहे. प्रतींत तिचा लेखनसमय निर्दिष्ट झालेला नाही, पण दिसण्यांत आणि इतर बाह्य नि सांसर्गिक प्रमाणांवरून ती अदमासें १२५ वर्षांपूर्वीची वाटते. अर्थात् ती या समश्लोकीस प्रथम मुद्रण-संस्कार होण्याच्या निःसंशय अगोदरची आहे. या पोथींत समश्लोकीचा कर्ता म्हणून वामनाचा किंवा इतर कोणत्याहि कवीचा स्पष्ट असा नामनिर्देश कोठेच नाही. पोथीच्या प्रारंभीं फेवळ "श्री अथ गंगालहरीसमश्लोकी प्रारंभः" आणि शेवटीं " इति श्रीगंगालहरीसमश्लोकीटीका समाप्तः ।। श्रीअजादुर्गादेवतार्पणमस्तु ।। " हीं वाक्यें आहेत. समश्लोकीचे या पोथींतील पाठ काव्यसंग्रहांतील नि मजसमोर असलेल्या इतर स्वतंत्र संस्करणांतील पाठांहून बरेच ठिकाणीं भिन्न आहेत नि क्वचित् सरसहि आहेत. या लेखांत वर समश्लोकींतील दोन उद्धरणें दिलीं आहेत तीं मी मुद्दाम या पोथींतूनच घेतलीं आहेत. त्यांजवरूनहि या पोथींतील पाठांची तुलनात्मक योग्यता जिज्ञासूंच्या लक्ष्यांत येऊं शकेल. पण या पोथींतील मुख्य उल्लेखनीय गोष्ट ही की मला उपलब्ध झालेल्या कोणत्याहि मुद्रित संस्करणांत न दिसणारे प्रारंभीं उपोद्घातात्मक एक नि शेवटीं उपसंहारात्मक एक असे दोन अतिरिक्त श्लोक हींत आढळतात. प्रारंभींचा श्लोक असा—

समारम्भें दम्भा त्यजुनि सुरसंभावितपदा
गुरुतें वन्दूनी हरति सकळां जेथ विपदा
तदाज्ञे श्रीमन्दाकिनिलहरिभावार्थ विरचीं
समश्लोकी लोकीं बुधहि अवलोकोत सुरुची ॥

येथपासून पुढे 'श्लोक' या निर्देशाने मूळ संस्कृत श्लोक आणि त्यानंतर 'टीका' या निर्देशाने प्रत्येकाची समश्लोकी असा क्रम शेवटपर्यंत आहे.

अन्तिम संस्कृत श्लोक—
इमां पीयूषलहरीं जगन्नाथेन निर्मिताम् ।
यः पठेत्तस्य जायन्ते सर्वत्र सुखसंपदः ॥

याच्यापुढे 'टीका' या संकेताने समश्लोकीचा उपसंहारात्मक पुढील श्लोक आहे :—
न जाणें चातुर्या सुरसवदलालित्यरचना
परी गङ्गा येथे अपण वदवी चारुवदना ।
जगन्नाथाचे तैं करि सकळ भावार्थ उघडे
तमोभ्रान्ता जैवीं दिनकर सखा दृष्टिस पडे ॥

## 'सखा' कवि संभावित कर्ता.

प्रास्ताविक-श्लोकांत कवीने 'देवांसहि पूज्य असलेल्या स्वगुरूस, त्याचा नामनिर्देश न करतां, वंदन केलें आहे आणि ही समश्लोकी रचण्यास त्याचीच आज्ञा झाली असल्याचें म्हटलें आहे. अंतिम श्लोकांत स्वतः गंगेने मूळ गङ्गालहरींतील सर्व भावार्थ स्पष्ट करून ते कवीच्या तोंडून वदविले असें सांगितलें आहे. अंतिम चरणांत आलेलें 'सखा' हें पद कवि-नामनिर्दशक असावें असें वाटतें.

## 'सखा' कवीची इतर रचना नि काळ.

स्वकृतीच्या शेवटीं 'सखा' किंवा 'राम सखा' या संकेताने स्वतःचा नामनिर्देश करणाऱ्या एका जुन्या कवीची "आनंदरस हा प्याला, भवताप शान्तचि झाला," इ. पदें आजहि भाविक वृद्धांच्या तोंडीं आहेत. या कवीच्या अनेक प्रसिद्ध अप्रसिद्ध कवनांची नोंद कै. गो. का. चांदोरकरांची महाराष्ट्रीय संत-कवि-काव्य-सूची[1], धुळ्याचे रामदासी संशोधन खंड १–२, तंजावर सरस्वतीमहाल ग्रंथालयाचीं मराठी-ग्रंथ-सूचीपत्रें भाग ३,[3] इ. मध्ये झाली आहे. याच्या कवनांत पदें, अभंग, इ० चा भरणा मुख्यत्वें असला तरी कांहीं कविता अक्षरगणवृत्तात्मकहि आहे. त्यावरून ही गंगालहरी-समश्लोकी या 'सखा' कवीने केली असणें शक्य कोटींतलें दिसतें. या 'सखा' कवीने तंजावरच्या राजकुलांतील शक १७३५ नि १७४० मध्ये झालेले फार थाटाचे असे कांहीं विवाहसमारंभ प्रत्यक्ष उपस्थितीने पाहून

१. पृ. ११२.
२. प्र. खं. पृ. १७७, ११७, २८५, द्वि. खं. पृ. ३४, ६९, ९८, १७८, ३८१, ३९३ इ.
३. पृ. २५, ४१, ५१, ७७, ७८, ११३, १७२, १७६, २०७, २२३, २९५, ३४५, इ.

त्यांच्या संदर्भाने रचलेलीं पुष्कळशीं मंगलाष्टकें नि इतर काव्यात्मक वर्गनें उपलब्ध आहेत. त्यांजवरून या कवीचा काळ (इ. १८००–१८२५ च्या आसपास) लक्ष्यांत येतो. तो वरील पाठविवेचनावरून निष्कर्षित होणाऱ्या समश्लोकीकाराच्या काळाशीं सुसंगत असाच आहे.

## पुढील संशोधनाची दिशा.

या 'सखा' कवीचें पूर्ण नांव कै. ल. रा. पांगारकरांनी भक्तिमार्गप्रदीपांत[1] सखारामबोवा कवाडकर असें दिलें आहे. कै. चांदोरकरांनी हा 'सखा कवि' नि सखोबा नाईक हे एकच काय अशी पृच्छा केली होती, पण तें एकव्यक्तित्व संभवनीय नसल्याचा निष्कर्ष रामदासी संशोधनांत घेतला आहे तो योग्य वाटतो. पण धुळ्यांतील एका बाडांत 'सखा' कवीचे गुरु कोणी जनार्दन दिसतात, तर दुसऱ्या बाडांत ते चाफळखोऱ्यांतील बाळनाथ नांवाचे संत असल्याचा निर्देश आहे. केवळ गुरुभेद हें एकच कारण व्यक्तीची अनेकता कल्पिण्यास पर्याप्त नसलें तरी 'सखा' या संकेताने स्वनामनिर्देश करणारे अनेक कवि असण्याचा संभव दुर्लक्षितां येत नाही. समश्लोकीकाराने प्रारंभीं स्वगुरूचा उल्लेख अनामिकच केला असल्याने त्यांतून या संबंधांत उपयोगी पडण्यासारखा दुवा हस्तगत होत नाही. तसेंच, समश्लोकीकाराचें नांव 'सखा' असणें निश्चितप्राय असलें तरी तें 'दिनकर' असण्याचीहि, अंधुकच कां होईना, संभाव्यता आहे. या नि अशाच इतर साधक–बाधक गोष्टींकडे उचित लक्ष्य देऊन या गंगाळहरी–समश्लोकीकाराच्या व्यक्तिनिश्चितीचा प्रयत्न महाराष्ट्रीय संशोधकांनी करावा.

१. आवृत्ति १५. पृ. ५४.

---

## शांततेच्या मेजावर

शांततेच्या मेजावर
ठेले युद्धाचे नकाशे
विझलेल्या निखाऱ्यांचे
कुणी फुलवी कोळसे
बंधु भावाचा चालला
किती प्रचंड सोहळा
पहा भरतभेटीचें
दृश्य मनोहर डोळां
विश्वशांतीच्या मंत्राचा
मुखें एकच गजर

आणि द्वेषाचा अंगार
पेट घेई घरोघर
कण ठेवणें न बरें
टाका फेडून उसनें
पूत रक्ताच्या स्नानाने
घातातीर्थीच्या पतनें
मग स्वर्गसुखें भोगा,
भोगा उरल्यास मही
परी आज शहाजणें
वाजूं द्यात करा वाई !

— गो. म. कुलकर्णी

# परीक्षणें

**कमळवेल** [काव्यसंग्रह. कवि–वि. म. कुलकर्णी. प्रकाशक : चित्रशाळा प्रकाशन, पुणें २. किंमत १।। रु. ]

काव्यसंग्रहाच्या नांवावरून कविप्रतिभेच्या स्वरूपाचें अंशत: दर्शन होतें असें म्हटलें तर त्याची अगदी साप्ताहिक राशिभविष्यांत गणना होऊं नये ! कुसुमाग्रज आपल्या संग्रहाला ' किनारा ' हें नांव देतात आणि बोरकर स्वतःच्या संग्रहाला ' आनंदभैरवी ' म्हणतात, तें काय केवळ कवीची लहर म्हणून ? कांत 'रुद्रवीणा' हातीं घेतात व पाडगांवकर 'धारानृत्यां'त निमग्न होतात, वसंत बापट ' बिजली ' मागे धावतात, तर इंदिरा सन्त ' शेला ' विणतात, यांत एक प्रकारचें औचित्य आहे. काव्याचें बाह्य स्वरूप व अन्तःस्वरूप यांचा सुसंवादच त्यांत प्रतिबिंबित झाला आहे. वि. म. कुलकर्णी यांच्या मागच्या काव्यसंग्रहाचें नांव होतें ' पहाटवारा '. आता ते रसिकांकडे ' कमळवेल ' घेऊन येत आहेत. या दोन्ही नांवांवरून कवीच्या प्रतिभेंत आणि त्याच्या काव्यप्रकृतींत मृदुत्व व माधुर्य यांना प्राधान्य आहे असा तर्क कोणी केला तर तो बरोबरच ठरेल.

१९३० ते ४० हें दशक हा रविकिरणमंडळाच्या वैभवाचा काळ. १९४० च्या आसपास कान्त, बोरकर, कुसुमाग्रज प्रभृतींची पिढी काव्यक्षितिजावर उज्ज्वलतेने चमकूं लागली. त्यांच्या आगेमागे इंदिरा सन्त, वि. म. कुलकर्णी, निकुम्ब, वसंत बापट, मंगेश पाडगांवकर इत्यादि कवि उदयाला आले. केवळ बाह्य स्वरूपाच्या दृष्टीने नव्हे तर अंतरंगाच्या दृष्टीनेहि या सर्वांचा वर्ग एकच आहे. गिरीश–यशवंतांच्या पिढीला कालदृष्ट्या जुने कवि म्हणून संबोधिलें तर हे सारे नवकवीच आहेत. गेल्या तपांतच त्यांच्या प्रतिभेचा खरा विलास प्रगट झाला झाला आहे. मात्र १९४५ नंतर नवकवि म्हणून गाजलेल्या रेगे, भावे, मर्ढेकर, मुक्तिबोध वगैरेंपेक्षा हा वर्ग भिन्न आहे. या दोन्ही वर्गांच्या काव्याच्या प्रेरणा, प्रतिभेचीं वैशिष्ट्यें कविमनावर होणाऱ्या सामाजिक प्रतिक्रिया आणि रचनेच्या लकबी या सर्वांतच महत्त्वाचे आणि मूलभूत भेद आहेत. त्यांची चर्चा करण्याची जागा ही नव्हे. कुलकर्णी ' कॅमेरा ', ' पॅटिस ' किंवा ' सिमीट ' हे शब्द कवितेंत वापरून ' पंक्चरली ' सारख्या शब्दप्रयोगाची आठवण करून देत असले, प्रसंगविशेषीं मुक्तछंदांचा आश्रय करीत असले किंवा ' श्रावणांतील सकाळ ' सारख्या रेखाचित्राचा शेवट—

' गवत खाणाऱ्या  
गाढविणीला —  
निवांतपणाने पीत उभें आहे  
गोजिरें बाळ '

असा करीत असले तरी त्यांची गणना कुसुमाग्रज–बोरकरांच्या वर्गांतच होईल. त्यांच्या श्रद्धा, आकांक्षा, जगाकडे आणि जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोण, रचनेतलें मृदुत्व इत्यादि गोष्टी त्या वर्गाशींच साम्य दर्शविणाऱ्या आहेत. ज्यांच्यामध्ये या दोन्ही वर्गांच्या छटा चांगल्या रीतीनें मिसळल्या आहेत असे कवि मला एकच दिसतात. ते म्हणजे विंदा करंदीकर.

कुलकर्णी यांची पहिल्या वर्गात गणना केली पाहिजे असाच ' कमळवेल ' चा संकलित संस्कार मनावर होतो.

कुठलेंहि ललित लिखाण वाचून झाल्यावर मी थोडा वेळ चिंतनाच्या द्वारें त्याचा आस्वाद घेतों. लिमलेटची गोळी किंवा पेपरमिंटची वडी विरघळली तरी जिभेवर रेंगाळणारा तिचा स्वाद अनुभवण्यांत बालकाला आनंद होतो ना? तोच मलाहि अशा वेळीं लाभतो. त्यामुळे कलाकृतीचा मनावर होणारा परिणाम अजमावतां येतो, कलाकाराची शक्ति व त्याच्या मर्यादा यांच्या सीमा स्पष्ट होतात. प्रत्येक क्षेत्रांतल्या नामांकित लोकांच्या त्यांच्या त्यांच्या वैशिष्ट्याप्रमाणे पंगती मांडण्याचा एक खेळ मी मनाशीं अनेकदा खेळतों. विद्यमान कवींच्या अशा पंगती मांडतांना कुलकर्णी मला दिसतात ते गिरीश, ठोकळ, ग. ह. पाटील, संजीवनी मराठे, निकुम्ब, शांता शेळके इत्यादींच्या रांगेंत.

' कमळवेल ' सहज चाळणाऱ्यालाहि कवीला किती विविध अनुभूतींचें संवेदन होतें हें पाहून कौतुक वाटेल. तो बाललीलांत रमतो, गृहिणी आणि रमणी यांचा सुंदर मधुर संगम घडवून आणणाऱ्या स्त्रीमनाचीं चित्रें रेखाटतो, श्रावणांतल्या प्रात:काळाचें एखाद्या कुशल छायाचित्रकाराप्रमाणे क्षणचित्र काढतो, पहिला भोंगा होऊन गेल्यामुळे गिरणीच्या वाटेने गडबडीने चाललेल्या गर्दीच्या सुखदु:खांविषयी सहानुभूति प्रगट करतो, कडुनिंबाच्या झाडामागून हासणारा चंद्र पाहून कालसागरांत विरघळून गेलेल्या मधुर स्मृतींच्या चिंतनांत दंग होतो. ' दिवा विझविला ', ' अर्घ्य ', ' अन्रे तव सहवास लाभुं दे ', ' झाडामागुन चंद्र हांसला ', ' मध्यान्हवेळीं ', ' वरात ', ' कां पुन्हां ', ' कधीं कधीं ' एवढ्याच कुलकर्ण्यांच्या कविता कुणी वाचल्या तरी त्यांच्या रचनेंतलें मृदुत्व आणि भावनेंतलें सुभगत्व यांचा मोहक ठसा त्याच्या मनावर उमटल्यावांचून राहणार नाही. बालमनाशीं एकरूप होण्यांत दिसून येणारें कवीचें चातुर्यहि मनोवेधक आहे. ' नकोच दर्शन ' किंवा ' मध्यान्हवेळीं ' अशा कवितांतून व्यक्त होणारी भावनेची सूक्ष्मता स्मरणीय ठरेल.

प्रत्येक कलावंताच्या शक्तींतून त्याच्या मर्यादा निर्माण होतात. कुलकर्णी कांही त्या नियमाला अपवाद नाहीत. मुलायम शैलीमुळे सामाजिक दु:खाची तीव्रता कवीला जाणवली असूनहि त्या अग्निज्वाळांचे चटके वाचकाच्या मनाला बसत नाहीत. भावनेच्या हिरकणीचें सौंदर्य भव्य कल्पनेच्या कोंदणांत अधिक खुलतें. पण कुलकर्ण्यांच्या कवि-प्रकृतींत जशी उच्छृंखलता नाही तशी उत्कटताहि नाही. पंख फुटूं लागलेलें पिल्लूं घरट्यांतून बाहेर डोकावून पाहतें ना? तसें त्यांचें जीवनाचें चित्रण वाटतें. त्यांची उदात्तता आणि उदासता सुद्धा त्यामुळे मर्यादित झाली आहे. त्या मर्यादेंत त्यांची कविता मोहक वाटते. पण ' कमळवेलींत'लीं चोपन्न प्रकरणें पुनःपुन वाचून ( आणि तींहि आगगाडींतल्या डब्यांत नव्हे ) त्यांचा संग्रह हातावेगळा केल्यावर एक गोष्ट माझ्या मनाला तीव्रतेने खटकली ती म्हणजे वाचकाला धुंद करण्याचें सामर्थ्य त्यांच्या कवितेंत नाही ही होय. ही धुंदी अभिजात वाङ्मयाचा एक महत्त्वाचा घटक आहे. माधवराव पटवर्धन ' ही गोष्ट हॉटिंग ( haunting ) आहे, ही कविता हॉटिंग ( haunting ) आहे ' असें नेहमी म्हणत; त्याच अर्थी मी धुंदी हा शब्द वापरीत आहें. रसिकांच्या मनाची पकड घेण्याची शक्ति, आपल्या वैशिष्ट्याने त्याच्या मनांत रेंगाळत राहण्याचें सामर्थ्य, हाच या धुंदीचा अर्थ आहे. निर्दोष तंत्ररचनेचें सौष्ठव, भाषेची प्रसन्नता या किंवा अशा प्रकारच्या गुणांनी ही धुंदी निर्माण होत नाही. तिचा उगम ललित लेखकाच्या

वाङ्मयीन व्यक्तित्वांत असतो. त्या व्यक्तित्वाची उंची आणि खोली जितकी अधिक तितकी त्यांतून निर्माण झालेल्या ललितकृतींत ही धुंदी व्यक्त होण्याचा संभव अधिक. टिळक व केशवसुत हे दोन समकालीन वरच्या दर्जाचे कवि तुळून पाहिले म्हणजे या धुंदीवर सहज प्रकाश पडतो. केशवसुतांची कविता टिळकांच्या मानाने ओबडधोबड आहे. पण तो ओबडधोबडपणा डोंगरांत खोदलेल्या विशाल लेण्याचा. टिळकांची कविता वाचतांना मन आनंदित होतें; पण केशवसुतांचें काव्य वाचतांना तें रोमांचित होतें. 'विरघळलीं स्वप्नांतच स्वप्नें' (पृ. २१), 'चित्र देवाघरचें हें भूमीवरी आलें काय !' (पृ. ५४), 'दलितांघरच्या दिवलीमधला। दिवा नव्याने जळूं लागला। तो फुरफुरता अग्नि पाहतां। मनांत परमात्मा हसला' (पृ. ७१) अशा कांही ओळींत या धुंदीच्या पुसट छटा दिसतात; नाही असें नाही. पण ती कुलकर्ण्यांची कविप्रकृति नाही. ती तशी असती तर दलितांत निर्माण झालेल्या चैतन्याचें वर्णन करणाऱ्या अग्नीची संभावना त्यांनी 'फुरफुरता' या कौटुंबिक शब्दाने केली नसती. त्या धुंदीची त्यांच्याकडून अपेक्षा करणेंहि एका दृष्टीने चुकीचें आहे. तशी अपेक्षा करणें म्हणजे कमळापाशीं रातराणीचा सुगंध मागण्यासारखें होईल.

या काव्यसंग्रहाला प्रसिद्ध कन्नडकवि श्री. बेंद्रे यांची प्रस्तावना घेऊन श्री. कुलकर्णी यांनी 'आंतरभारती'च्या कार्याला निःसंशय साहाय्य केलें आहे.

—वि. स. खांडेकर.

शेला [ कवयित्री श्रीमती इंदिरा संत. जयहिंद प्रकाशन, झावबावाडी, मुंबई २. मूल्य दोन रुपये. पृष्ठसंख्या ८४. ]

गेल्या मे च्या पहिल्या आठवड्यांत मुंबई व उपनगर साहित्यसंमेलनाचें अध्यक्षस्थान मंडित करणाऱ्या आजच्या एक श्रेष्ठ मराठी कवयित्री इंदिरा संत यांच्या अनुभूतिपूर्ण बावन्न कवितांचा हा दुसरा संग्रह आहे. 'सहवास' हा त्यांच्या व त्यांचे पति कै. ना. मा. संत यांच्या कवितांचा पहिला जोड संग्रह. त्यानंतर बरोबर दहा वर्षांनी त्यांचा एकटीचा असा हा स्वतंत्र संग्रह प्रसिद्ध होत आहे. यांत 'सहवासां'तील कांही कविता पुन्हा घातल्या आहेत. त्यामुळे दहा वर्षांत इंदिराबाईंच्या कवितेने विकसनोन्मुख जें नवें वळण घेतलें तें आयतेंच लक्षांत येण्याची सोय झाली आहे.

मुंबईच्या आपल्या भाषणांत इंदिराबाईंनी 'कवितेची मूलभूत शक्ति आत्मनिष्ठा ही होय आणि तिचें मूल्य तिच्या विषयांत अथवा आशयांत नसून तो व्यक्त करणाऱ्या कवीच्या सामर्थ्यांत आहे.' अशा अर्थाचा एक सिद्धांत प्रस्थापित केला होता. 'शेल्यां'तील कविता त्या सिद्धान्ताच्या निकषावर घासून पुसून पाहिल्यास बावनकशी ठरतात असा निर्वाळा देण्यास कांहीहि हरकत नाही. इंदिराबाईंच्या कवितांचा विषय प्रेमळ पतीचा चिरविरह हा एकच आहे आणि आशय म्हणजे त्याच्या सुखकर स्मृतींचा सहवास हा एकच आहे. परंतु त्यांना अभिव्यक्ति देतांना इंदिराबाईंनी ज्या सर्वथैव नवीन व संपूर्णतया मौलिक प्रतिमा उभ्या केल्या आहेत त्यांत त्यांच्या स्वतंत्र व्यक्तित्वाचें विलोभनीय वैशिष्ट्य प्रकट झालें आहे. 'कुठे', 'माझी प्रीत', 'कातरवेळेला', 'प्रतीक्षा', 'अडखळे', 'उत्फुल्ल पीत हें' इत्यादि त्यांच्या कविता वाचल्यास या विधानाचें प्रत्यंतर पटेल. इंदिराबाईंच्या कवितेचा बराच मोठा भाग याच प्रकारच्या चिरविरहाच्या विलापिकांनी व्यापिलेला आहे. त्यांच्यांतला तोचतोपणा

त्यांत प्रतिबिंबित झालेल्या कवयित्रीच्या निरनिराळ्या अंतर्वृत्तींमुळे कंटाळवाणा होत नाही हें जितकें खरें आहे, तितकेंच हें देखील खरं आहे की त्यांतील अतिरिक्त हळुवारपणामुळे त्यांचा मनावर जो परिणाम होतो तोहि शाश्वत स्वरूपाचा राहात नाही.

उत्कट प्रेमाप्रमाणेच त्याच्या पोटीं येणाऱ्या जिवंत वात्सल्यासहि इंदिराबाईंनी आपणावलें आहे. पतिप्रेम आणि अपत्यप्रेम यांच्या बाह्य स्वरूपांत जरी अंतर असलें, तरी त्यांचा स्थायीभाव एकच असतो. कै. ना. मा. संत यांच्या भूतकालीन अस्पष्ट व अंधुक स्मृतींत तरंगणें हा जसा आता इंदिराबाईंच्या विरंगुळ्याचा विषय आहे, त्याचप्रमाणे आपल्या अपत्यांच्या भावी उज्ज्वल व आशादायक जीवनांत रंगणें हाहि त्यांच्या विसाव्याचा विषय आहे. 'चाहूल', 'ये रे ये', 'दांतकणी', 'बाळ होता रंगला', 'गाई गाई', इत्यादि वत्सलगीतें या विधानाची साक्ष देतील. परंतु याहि गीतांत अतिरिक्त हळुवारपणाचा आढळ होतो हें सत्य दृष्टीआड होत नाही. टेनिसन्‌ने आपल्या Home they brought her warrior dead या सुप्रसिद्ध कवितेंत पतिप्रेम व वात्सल्य यांचें जें तेजस्वी व सत्त्वशील चित्र रेखाटलें आहे, त्या प्रकारच्या कवितांची अपेक्षा रसिक इंदिराबाईंकडून करीत आहेत. अतिरिक्त हळुवारपणा आणि निःसत्त्व हळवेपणा यांचा प्रभाव चिरस्थायी नसतो हें काय त्यांना सांगावयास हवें ?

नैसर्गिक कवित्वशक्तीप्रमाणेच इंदिराबाईंच्या ठिकाणीं अभ्यासानें कमावलेली सदभिरुचिपूर्ण व संयमशील कलाशक्तिहि आहे हें त्यांची कोणतीहि कविता वरवर चाळली तरी सहज ध्यानांत येतें. या कलादृष्टीने 'ही निळी पांढरी' ही त्यांची कल्पनामधुर वर्णनपर कविता सर्वोत्तम व सर्वोत्कृष्ट उतरली आहे:—

ही निळी पांढरी शरदांतील दुपार
तापल्या दुधापरि ऊन हिचें हळुवार
दाटली साय की स्निग्ध शुभ्र आकाशीं
फिरतात तशा या शुभ्र ढगांच्या राशी
कुणि परीट तेथे काळ्या दगडावरतीं
धूतसे शब्द तो धुंद कोंदला भवती
दोरीवर हाले कपड्यांची ती ओळ
तरळते संथ ती बगळ्यांची का माळ ?
दिग भरलेली ही काय तरी गर्भार
टाकीत पावलें चाले रम्य दुपार !

क्वचित् अनवधानाने इंदिराबाईंच्या कवितांत कांही दोष राहून गेले आहेत. 'निर्भर' हा शब्द त्यांनी अर्थ न कळतांच योजिला आहे, 'केव्हांपून' बद्दल 'केव्हांहून' असा प्रयोग केला आहे, सिगरेटच्या दर्पाला सुकुमार म्हटलें आहे, म्हशीच्या डुंबण्याला जलविहार मानलें आहे. सांडगे घालणाऱ्या बालिकेच्या नयनांत मदिरा होती असें सांगितलें आहे आणि हळुवार या शब्दाचा तर हवा तसा उपयोग केला आहे. गालबोट खुलून दिसतें हें खरें, पण तें बालवयांतच. तपा-दीडतपानंतरच्या कवितांत असले लहानसहान दोष नसावे असेंच कुणीहि निःपक्षपाती टीकाकार मत देईल.

परंतु एकंदरीत इंदिराबाई संतांची कविता ही 'संतसाहित्या' प्रमाणेच पवित्र, सोज्ज्वळ व निर्मळ आहे. तिचा संग्रह कोणीहि आनंदाने करील. अशा सोज्ज्वळ व सुंदर कविता लिहिणाऱ्या या कोमल अंतःकरणाच्या कवयित्रीने मुंबईच्या संमेलनांत

'खुणा', 'नाल', 'विस्तीर्ण गुहा', 'दुपार' इत्यादि आपल्या कविता उत्स्फूर्त, होण्यास जे प्रसंग कारण झाले त्यांचें जें स्पष्टीकरण केलें आहे, तें टीपांच्या रूपांनी कविता-संग्रहाच्या शेवटीं जोडलें असतें, तर रसिकांना कवितांचा आस्वाद लुटण्यास अधिक साहाय्य झालें असतें. हा संग्रह संमेलनाच्या पूर्वींच बाहेर पडला होता हें खरें आहे. परंतु कवितांचें स्पष्टीकरण त्यापूर्वींहि कवयित्रीला देतां येणें शक्य होतें. मात्र संमेलनांत स्वतःच्या कवितांचें स्पष्टीकरण करतांना कवयित्रीने अन्य प्रथितयश कवींच्या कवितांवर टीका करण्याचें कटाक्षाने टाळलें असतें तर बरें झालें असतें. यशवंतांची 'आई' व आपली 'आई' यांची तुलना करतांना आपल्या 'आत्मनिष्ठे'स 'आत्मप्रौढी'चा स्पर्श होत आहे हें कवयित्रींच्या लक्षांत आलें नसावें असें दिसतें. "यशवंतांची 'आई' ऐकावयाला फर्गसन कॉलेजच्या ॲंफीथिएटरची गॅलरी देखील अगदी गच्च भरून जाई" हे खुद्द कवयित्रीचे शब्दच यशवंतांची 'आत्मनिष्ठा' ही किती व्यापक आहे आणि सर्वसामान्य भावनेवर कविता लिहितां येणें हें कसें असामान्य कार्य आहे या गोष्टीवर लख्ख प्रकाश पाडतात !

इंदिराबाई या आपल्या 'शेल्या' ला जरी वसंतसेनेच्या अंगावर फेकलेला चारुदत्ताचा सुगंधी शेला समजत असल्या तरी वास्तविक त्यांतील आत्मतृप्ति, निरहंकार, रम्य उदासीनता, शांतता इत्यादि गुण लक्षांत घेतल्यास तो कबीरासारख्या संतांचा आहे असें वाटतें. कविता-लेखनाच्या बाबतींत त्यांनी आपली अलिप्तता आजपर्यंत जशी कायम ठेवली आहे, तशीच ती पुढे ठेवावी आणि 'ओढाळमस्तीच्या' आहारीं जाऊं नये अशी त्यांना बंधुभावाची सूचना द्यावीशी वाटते.

—भ. श्री. पंडित.

साक्षात्कार [ पूर्वार्ध, कवि 'श्री' कृत मुक्तच्छंदात्मक खंडकाव्य. प्रकाशक : तु. ना. काटकर, गोंडवण साहित्य संस्था, चांदा, म. प्र. पृष्ठें : एकशे अठरा. किंमत २॥. रुपये.]

विदर्भातील कवि अनिल व श्री. वा. ना. देशपांडे यांनी रूढ केलेला मुक्तच्छंद आता कितीतरी मराठी कवींनी वापरावयाला सुरुवात केली असून विशेषेंकरून कथनात्मक काव्यांत त्याला एक विशेष अग्रस्थान प्राप्त झालें आहे. 'श्री' हे एक विदर्भातील प्रसिद्धिपराङ्मुख नवोदित कवि असून चांद्यासारख्या आडवळणाच्या गांवीं त्यांनी आपल्या काव्यरचनेच्या प्रयोग चिकाटीने चालवावा ही गोष्ट कविप्रकृतीस साजेशीच आहे. प्रस्तावनाकार डॉ. कोलते यांनी म्हटल्याप्रमाणे 'साक्षात्कारां'त आधुनिक प्रेमकाव्य व जुनें भक्तिकाव्य यांचा मिलाफ झाला असून त्यांतील राजकवीचें चित्रण मोठें सूचक झालें आहे. मुक्तच्छंद हा बऱ्याच अंशीं गद्य-सदृश छंद असून 'गद्यं कवीनां निकषं वदन्ति' या न्यायाने खऱ्या काव्यशक्तीची ती कसोटीच आहे. कवि 'श्री' त्या कसोटीस उतरतील असे पुष्कळ प्रसंग या काव्यांत आहेत. 'अनिलां'ची 'भग्नमूर्ति' समोर ठेवूनच ही रचना झाली असली तरी 'श्री'ची प्रतिभा ही पृथगात्म आहे व तिचे अनेक मनोहर विलास 'साक्षात्कारां'त उमटले आहेत.

झालेत अगणीत
प्रलयकाळ

जुनें जाऊन नवें आलें जग
परंतु संसार ओसाडला नाही

ही या काव्याची पृष्ठभूमि असून जीवनविषयक दुर्दम्य आशावादाचें चित्रण येथे आढळतें. या खंडकाव्याचा उत्तरार्ध जेव्हा प्रकाशित होईल तेव्हाच या संपूर्ण खंडकाव्यासंबंधी यथार्थ मतप्रदर्शन होऊं शकेल. यापुढेंहि मुक्तच्छंदांत अधिकाधिक सफाईदार रचना त्यांच्या हातून घडो असें इच्छितों.

— माधव गोपाळ देशमुख

सुश्लोक मानस (बालखंड) [ अनुवादक व प्रकाशक : डॉ. रा. चिं. श्रीखंडे, कोल्हापूर. मूल्य ५ रुपये ]

गोस्वामी तुलसीदास यांचें नांव कुणाला माहीत नाही ! ते एक महान संत व भक्तकवि उत्तरहिंदुस्थानांत सुमारें चारशे वर्षांपूर्वी होऊन गेले. हिंदींतील अवधी, व्रज इत्यादि अनेक पोटभाषांत त्यांनी आपले काव्यग्रंथ रचले आहेत. त्यांपैकी अत्यंत महत्त्वाचें काव्य म्हणजे 'रामचरितमानस' किंवा 'तुलसीरामायण.' हा काव्यग्रंथ इतका लोकप्रिय आहे की, आजहि तो रोज घरोघरीं मोठ्या भाक्तिभावाने व आदराने वाचला जातो. खेड्यापाड्यांतूनहि त्यांतील दोहे व चौपाया गाइल्या जातात. अशा या महाकाव्याचा कोल्हापूर येथील रसिक कवि डॉ. रामचंद्र चिंतामण श्रीखंडे यांनी श्लोकबद्ध अनुवाद करण्याचा संकल्प केलेला आहे आणि पहिला भाग म्हणून 'बालकाण्डा'चा 'सुश्लोकमानस' रसिकांना सादर केला आहे.

डॉ. श्रीखंडे यांनी यापूर्वी संस्कृत साहित्यांतील मेघदूत, गीतगोविंद, कुमारसंभव ह्या अभिजात काव्यग्रंथांचे सुश्लोकमेघ, सुश्लोकगोविंद व सुश्लोककुमार या नांवाचे श्लोकबद्ध अनुवाद करून संस्कृत न जाणणाऱ्यांवर मोठेच उपकार केलेले आहेत. भारत स्वतंत्र झाल्या-नंतर त्यांतील बहुविध भाषांतील उत्तमोत्तम कलाकृतींचा परिचय करून घेणें हें प्रत्येक भारतीयाचें कर्तव्य ठरतें. अशा आदानप्रदानाच्या या संधिकालांत हिंदी रामचरितमानसाचा अनुवाद करण्याचा संकल्प डॉ. श्रीखंडे यांनी सोडला. त्यांच्या या उपक्रमाबद्दल ते खरोखरच धन्यवादास पात्र आहेत.

रामचरितमानसाचा हा मराठी अनुवाद प्रथमच होत आहे असें मात्र नाही. यापूर्वीहि याचे तीन अनुवाद झालेले आहेत. नागपूरचे सुप्रसिद्ध सत्पुरुष कै. यादव शंकर जामदार यांनी संपूर्ण रामचरितमानस गद्यांत भाषांतरित केलें आहे; तर ग्वाल्हेरचे श्री. गणेश सदाशिव भोपटकर यांनी त्याचा चौपाई वृत्तांत अनुवाद केला आहे. श्री. प्रज्ञानंद सरस्वती यांनीहि समवृत्तांत म्हणजे दोहा, चौपाई, सवैयादि वृत्तांमध्ये रामचरितमानस मराठींत आणलें आहे. या तिन्ही अनुवादांहून डॉ. श्रीखंडे यांच्या अनुवादाचें स्वरूप वेगळें आहे. त्यांनी आपल्या अनुवादासाठी संस्कृतमधील श्लोकवृत्तें वापरलीं हा त्याचा विशेष होय.

कोणत्याहि भाषेंतील मूळ काव्याचें दुसऱ्या भाषेंत भाषांतर करणें फार कठीण काम असतें. त्यामुळे मुळांतील बरीचशी गोडी नाहीशी होते. तथापि, भाषांतर करतांना दुष्यंताने काढलेल्या शकुंतलेच्या चित्राप्रमाणे 'अहो आश्चर्यम्। जाने अग्रतो वर्तते मे सखी' असें तंतोतंत भाषांतर करण्याचें ध्येय भाषांतरकाराने आपल्यासमोर ठेवलें पाहिजे; आणि तसें तें डॉ. श्रीखंडे यांनी आपल्यासमोर ठेवलें आहे. त्यांनी आपली भूमिका

'जें बोलिलें तुलसीदास कवीश्वराने। त्यातेंचि मी अनुसरें अपुल्या स्वराने ॥' तसेंच
'जें वागधीश तुलसी विनयें वदे तो। तें 'राम'ही अनुवदोनि सभाव देतो.'

ह्या पंक्तींत स्पष्ट केलेली आहे आणि त्याप्रमाणेच मुळांतील आशय अनुवादांत उतरविण्याचा यशस्वी प्रयत्न केलेला आहे. उदा०—

रामाच्या विरहाच्या भीतीने सीता आपले गोंडस हात तसेच निश्चल ठेवते. कारण त्या हातांतील रत्नकंकणांत लावण्यनिधान रामाचीं प्रतिबिंबें दिसत होतीं—

निज-पनि-मनि महँ देखि प्रतिमूरति सु-रूप-विधानकी ।
चालति न भुजवल्ली विलोकनि विरह-भय-बस-जानकी ।।

ह्याचा,—

स्वपाणिकंकणमणींत बिंबित सीता राघवरूप बघे ।
हलवी ती नच भुजवल्लीहीं जणुं विरहार्ती तिज विलगे ।।

असा सुंदर अनुवाद श्रीखंड्यांनी केलेला आहे. असेंच एक दुसरें उदाहरण पहा : रामलक्ष्मण जनकनगरींत बाग पहायला गेले तेव्हा दृष्टीस पडलेल्या रामलक्ष्मणांचें अवर्णनीय सौंदर्य वर्णन तरी कसें करायचें ? कारण,

देखन बाग कुअँर दुअि आये । बयकिसोर सब भाँति सुहाये ।
स्याम गौर किमि कहउँ बखानी । गिरा अनयन नयन बिनुबानी ।।

ह्याचा डॉ. श्रीखंडे यांनी केलेला हा अनुवाद—

आले कुमारयुग बाग बघावयातें ।
आहे किशोरवय सुंदरता किती ते ।
श्यामांग गौरतनु भा कथि कोण वर्णी ।
वाणीस ना नयन, ना नयनास वाणी ।।

हें रूपांतर तंतोतंत नाही असें कोण म्हणेल ?

कचित् वृत्तसुखार्थ श्रीखंडे यांना एखादा दुसरा शब्द कमीअधिक करावा लागला हें खरें; पण त्यामुळे तुलसीदासजींच्या भावार्थाला धक्का लागूं न देण्याची त्यांनी काळजी घेतलेली आहे.

रामचरितमानसाच्या नमनाचा सोरठा पुढीलप्रमाणे आहे:—

जेहि सुमिरत सिधि होअि गननायक करि-बर-बदन ।
करअु अनुग्रह सोअि बुद्धिरासि सुभ-गुन सदन ।

या सोरठ्याचा डॉ. श्रीखंडे यांनी पुढीलप्रमाणे अनुवाद केला आहे.—

ज्याचें शुभस्मरण सिद्धिद सर्व कार्मी । तो श्रीगणेश गुणराशि नमीतसें मी ।
श्री शारदावर गजानन विघ्नहर्ता । माझ्यावरी करु अनुग्रह बुद्धिदाता ।।

यांतील 'श्रीशारदावर' व 'विघ्नहर्ता' या शब्दांना मुळांत आधार नाही. वृत्तासाठी हे शब्द वापरावे लागले आहेत यांत शंका नाही. पण त्यामुळे भावार्थाला ढळ पोचलेला नाही.

संशयग्रस्त सती शिवाशेवरून रामाची परीक्षा घेण्याकरिता निघाली. तिने सीतेचा वेष धारण केला. राम येत होता त्या वाटेने ती समोरून जाऊं लागली. सतीचें हें कपट रामाच्या लक्षांत तावडतोब आलें. हें सांगतांना तुलसीदासजी म्हणतात:—

सतीकपट जानेउ सुरस्वामी । सबदरसी सब अंतरजामी ।।
सुमिरत जाहि मिटअि अज्ञाना । सोअि सर्वज्ञ राम भगवान
सती कीन्ह चह तहहूँ दुराअू । देखहु नारि-सुभाअु-प्रभाअु ।

याचा अनुवाद डॉ. श्रीखंडे यांनी पुढीलप्रमाणे केला आहे:—

> "जाणे सतीकपट तें प्रभु रामराय। जो सर्वसाक्षि सकलांतरवासि होय।
> अज्ञाननाश क्षणिं ज्या स्मरतांचि व्हावा। सर्वज्ञ तो तुम जतांचि कसा रहावा?॥
> मांडी सती परि तिथेहि असत्यभाव। नारीस्वभावचि असा कुटिलप्रभाव"

त्यांतील 'नारी-सभाउ-प्रभाउ' ह्याचा 'नारीस्वभावचि असा कुटिलप्रभाव' हा अनुवाद शब्दशः बरोबर नाही. तुलसीदासांनी स्त्रियांवर 'कुटिल' स्वभावाचा प्रत्यक्ष आरोप केलेला नाही, तो सूचित केलेला आहे. डॉ. श्रीखंडे यांनी तो आशय 'कुटिलप्रभाव' हा शब्द वापरून स्पष्ट केला आहे. त्यामुळे मूळांतील सूत्रकता नष्ट झाली हें खरें, पण अभिप्रेत अर्थ कायम आहे. हा प्रकार वृत्ताच्या सोयीसाठी झाला असला तरी त्यामुळे मूळ अर्थाचा विपर्यास होतो असें मला वाटत नाही. भाषांतरामध्ये असा कमीअधिकपणा होणें अपरिहार्य असतें. तथापि डॉ. श्रीखंडे यांनी केलेला अनुवाद मुळाप्रमाणेच रसाळ आहे यांत संशय नाही. रामचरितमानसाच्या बालकांडांतील मूळ ३६२ पद्यांचे डॉ. श्रीखंडे यांचे जवळजवळ २१५० श्लोक झाले आहेत. ग्रंथ दोहा, चौपाई, सोरठा अशा विविध छंदांत असून डॉ. श्रीखंडे ह्यांनी शार्दूलविक्रीडित, उपजाति, इंद्रवज्रा इत्यादि विविध संस्कृत वृत्तांची योजना केलेली आहे. संस्कृत वृत्तें व संस्कृत-प्रचुर शब्दांचें वैपुल्य ह्यामुळे ही समग्र रचना प्रौढ उतरली आहे. त्यामुळे संस्कृतज्ञ रसिकांना ह्या काव्याचा आस्वाद घेतांना मोठा हर्ष होईल हें खरें; पण संस्कृत न जाणणाऱ्या सर्वसामान्य जनतेला मात्र ह्याचा फारसा उपयोग होणार नाही. हाच अनुवाद सुंदर गद्यांत झाला असता तर काव्यास्वादाच्या दृष्टीने अधिक बरें झालें असतें. पद्यांतच अनुवाद करायचा तर निदान आधुनिक कवींप्रमाणे सुटसुटीत छंदांचा उपयोग करायला हवा होता. त्यामुळे सामान्य रसिकांना तुलसीदासांच्या 'रामचरितमानसा'चा अधिक चांगला परिचय करून घेतां आला असता. निदान मूळ समवृत्तांत रचना केली असती तर दोहा, चौपाई इत्यादि छंदांची मराठींत भर पडली असती; आणि मराठी छंदांचें वैभव तरी वाढलें असतें. संस्कृतज्ञ लोकांना अत्यंत अल्प प्रयासाने मूळ हिंदी रामायण सहज वाचतां येतें. त्यांच्यासाठी अशा अनुवादाची तितकीशी गरज भासत नाही. विश्ववंद्य कवि कै. टागोर यांचीं काव्यें इंग्रजींत 'गद्यां'तच अनुवादित झालेलीं आहेत आणि म्हणूनच टागोरांचा संदेश इंग्रजी जाणणाऱ्या सामान्य माणसालाहि सुलभतेने समजून घेतां येतो. तसाच डॉक्टरसाहेबांना तुलसीदासांच्या काव्यांतील आशय सरस 'गद्यां'त उतरवून सामान्य माणसांपर्यंत पोचवतां आला असता.

असें असलें तरी डॉक्टरसाहेबांच्या 'सुश्लोकमानसा'चें महत्त्व कोणत्याहि प्रकारें कमी होत नाही. त्यांच्या अयोध्याकांडाचा अनुवाद तयार असून आणखी पांच काण्डांचाहि अनुवाद ते लौकरच पूर्ण करणार आहेत असें आश्वासन ते प्रस्तावनेंत देतात. अनुवादाचें हें प्रचंड कार्य करण्याची त्यांची चिकाटी वाखाणण्यासारखी आहे. — उषा कोलते.

**श्रीएकनाथ-दर्शन** [प्रकाशक : श्री एकनाथ संशोधन मंदिर, औरंगाबाद (हैदराबाद राज्य) पृ. ३९३ + २४ किंमत ८॥ रुपये.]

'ज्ञानेश्वर–दर्शन' नांवाच्या दोन खंडांतून ज्ञानेश्वरांच्या विविध कार्याचें विवेचन मराठींत केलें गेलें आहे. त्याच धर्तीवर संपादन केलेला एकनाथविषयक तेवीस लेखांचा हा एक

संग्रह आहे. यांतील सुरवातीचे सात लेख आचार्य विनोबा भावे व नामदार मावळंकर, गाडगीळ, अणे, खेर, राजेसाहेब औंध व फुलचंद गांधी यांचे आहेत. पैकीं विनोबा व लोकनायक अणे यांच्या लेखांत कांही विचारणीय असे नवे मुद्दे आहेत. पण इतर नामदार मंडळींना येथे आवाहन करण्याचें कांही प्रयोजन होतें असें त्यांच्या लेखांवरून तर मुळीच दिसत नाही. ही मंडळी राजकारणादि क्षेत्रांतील मोठे मोहरे आहेत म्हणून किंवा साहित्याच्या विशिष्ट क्षेत्रांत त्यांनी कांही कामगिरीहि केली आहे म्हणून किंवा कोणत्याहि 'यशसेऽर्थकृते,' त्यांना एकनाथी वाङ्मयाचा यथामति अभ्यास केलेल्या साहित्यिकांच्या पंक्तींत वळेंच घुसवावें हें जसें संपादकांना, इतर लेखकांना, श्रीएकनाथांना, त्याप्रमाणे खुद्द त्या त्या नामदारांनाहि अन्याय करणारें आहे. संपादनाच्या दृष्टीने राष्ट्रपति वा डॉ. आंबेडकरांचे संदेश छापणें वेगळें व चारपांच कंठाळी स्वरूपाचे असे लेख मूळ ग्रंथांत केवळ लेखक–माहात्म्यासाठी समाविष्ट करणें वेगळें. या ग्रंथाची दुसरी आवृत्ति काढण्याची वेळ आल्यास अभ्यासकांच्या सोयीकरता प्रा. फाटक व प्रा. रा. द. रानडे यांचें प्रास्ताविक ठेवून हें 'नामदारी भारूड' तींतून वगळलें जाईल याची संपादकांनी काळजी घ्यावी. तोंपर्यंत भयंकर प्राणी फक्त व्यासपीठावरच वावरत नसून त्यांचा संचार ग्रंथारंभींहि होत असतो याचेंच दर्शन होत राहील.

एकनाथदर्शनापूर्वी या नामदारांना वंदन करून पुढे जातांच, 'नाथदर्शन व महाराष्ट्रांतील थोर पुरुषांत नाथांचें स्थान' हा श्री. शि. न. भावे यांचा लेख दिसतो. तो जितका सूत्रबद्ध तितकाच मार्मिक असून त्यांनी नाथांचें संतमालिकेंतील स्थान सम्यक् तुलनेने दर्शविलेलें पाहून संतोष होतो. 'श्रीएकनाथांचा पहिला ग्रंथ' म्हणजे चतुःश्लोकी भागवत टीका हा श्री. गर्गे शास्त्री यांचा मुद्दाहि लहानसा पण सूचक आहे. नाथांचें रुक्मिणीस्वयंवर (प्रा. आगाशे) श्रीएकनाथांचें स्फुटकाव्यदर्शन (कविभूषण प्रा. खापर्डे) एकनाथी भारूड (डॉ. नांदापूरकर) व भावार्थ रामायणाचें अज्ञात उत्तरकांड (श्री. कानोले, नांदेड) हे चार लेख म्हणजे 'एकनाथ–दर्शना'चा गाभा असून महाराष्ट्रांतील या चार अधिकारी व व्यासंगी विद्वानांनी श्रीएकनाथांच्या प्रमुख कृतींवर अभ्यासपूर्वक नवा प्रकाश टाकला आहे. 'एकनाथी भागवता'वर एखादा स्वतंत्र व्यासंगपूर्ण लेख या संग्रहांत समाविष्ट होणें अवश्य होतें. परंतु श्री. ज. स. करंदीकरांच्या 'श्रीएकनाथी भावार्थरामायणा'वरील सामान्य दर्जाच्या लेखासारखें एकनाथी भागवतावरहि कांही जुजबी लिखाण देण्याऐवजी हा थोर ग्रंथ त्या बाबतींत स्वतंत्रविवेचनविरहित ठेवण्याचेंच संपादकांनी औचित्य राखलेलें दिसतें.

नाथांचीं चरित्रें (श्री. कोटनीस), नाथांचें जोहार (श्री. रसाळ), योगेश्वर श्रीएकनाथ (श्रीचैतन्यानंद यति), एकनाथांची भाषाशैली (प्रा. लागू), कानडी लिपींत नाथभागवत (श्री. पोहनेरकर), लोकसाहित्यकार नाथ (डॉ. तुळपुळे) व एकनाथांचें हस्ताक्षर असेंच असेल काय? (म. म. पोतदार) हे छोटेखानी लेख आपापल्या प्रमेयांचें साक्षेपपूर्वक दिग्दर्शन करणारे असून त्यांनी दाखविलेल्या प्रकाशकिरणांमुळे एकनाथदर्शन अधिक सम्यक् रीतीने घेतां येतें यांत शंका नाही. विशेषतः प्रा. लागू व डॉ. तुळपुळे यांचे लेख विचारप्रवर्तक व नवा दृष्टिकोण देणारे उतरले आहेत.

"नाथांच्या काव्याची बैठक व त्याचा उठाव" हा प्रा. डॉ. वाटवे यांचा लेख एका वेगळ्याच अर्थाने विचारप्रवर्तक आहे. ज्ञानेश्वरादि मराठी संत–कवींना ते 'कवि'च नाहीत असे म्हणणारे जे अनेक विचारवंत गेल्या शतकांत झाले त्यांच्या परंपरेंत डॉ. वाटवे मोडतात. त्यांचे एतद्विषयक विचार यापूर्वी कोठे कोठे स्फुट रूपाने व्यक्त झाले होते. ते व नाथदर्शनाच्या

निमित्ताने त्यांनी संकलित करून येथे नव्याने मांडले आहेत. इतिहासाचार्य राजवाडे, डॉ. केतकर अथवा प्रा. वासुदेवराव पटवर्धन यांनी हे विचार वेगवेगळ्या दृष्टिकोणांतून प्रसंग-विशेषीं कांही मुरड घालून पूर्वी मांडलेले आहेत; आणि गेल्या कांही वर्षांत नवनवीन चिकित्सकांनी संतकाव्याचा समग्र अभ्यास करून व संत काव्याचें नानाप्रकारें रसग्रहण करून त्यांचा फोलपणा परस्परच सिद्धहि केलेला आहे. पण डॉ. वाटव्यांसारख्या रसविमर्शकांनी हे विचार एकनाथदर्शनाची संधि साधून व अधिक निश्चितपणा स्वीकारून पुनः मांडले असल्यामुळे त्यांचा येथे उचित परामर्श घेणें अवश्य झालें आहे.

मराठी संतवाङ्मयाविषयी डॉ. वाटवे यांनी बनविलेलीं मतें त्यांच्याच शब्दांत अशीं आहेत : ( १ ) संस्कृत साहित्यशास्त्रांत ज्याला साहित्य किंवा काव्य म्हणतात, तसल्याच स्वरूपाचें सर्व मराठी वाङ्मय नाही. ( २ ) मराठी संत आपल्या सर्वच लिखाणाला कवित्व आणि सर्व लेखकांना कवि म्हणत असले तरी त्यांचें सर्वच लिखाण काव्यरूप नाही. ( ३ ) तें ( संतवाङ्मय ) लिहिणाराची वृत्ति अकाव्य वाङ्मयानुकूल आहे म्हणून तें अकाव्य आहे. ( ४ ) कवित्वाची कसोटी त्यांच्यामतें गौणपणाची आहे.

हीं प्रमेयें सिद्ध करण्यासाठी त्यांनी संतांची दृष्टि 'बोधप्रधान' आहे; संतवाङ्मय 'निव्वळ' रंजनासाठी नाही, ' क्रिया पालटण्यासाठी ' आहे; त्यांना ' लौकिक काव्य काव्य म्हणून संमत नव्हतें, याचा अर्थ काव्यांतली ' कलाकुसर , रसवत्ता, अलंकार ' हे त्यांना ' नको होते असें नाही. ' शास्त्ररूप वाङ्मय वस्तुनिष्ठ ( Objective ) व काव्यरूप वाङ्मय आत्मनिष्ठ ( Subjective ) असतें; काव्य व अकाव्य यांतील फरक केवळ वर्ण्य विषयाने पडतो असें मात्र नाही; इत्यादि मुद्यांचा खल केला असून नाथांना प्रतिभेचें लोकोत्तर देणें मिळालें नाही हें सांगतांना ज्ञानेश्वर, नरेंद्र किंवा मुक्तेश्वर यांना मात्र तें लाभलें अशीहि कबुली दिली आहे. तुकाराम महाराजांचे बहुतेक बोल आत्मनिष्ठ व आत्मनिवेदनपर आहेत. पण नाथांचें तसें नाही. ( तरी पण ) रुक्मिणीस्वयंवर व भावार्थ रामायण व कांही इतर स्थळें सोडून दिलीं तर त्यांची दृष्टि वस्तुनिष्ठ आहे, असा निर्वाळाहि त्यांनीं दिला आहे.

संस्कृत साहित्यशास्त्रात ज्याला साहित्य ( म्हणजे शब्द आणि अर्थ यांचा रमणीय सहभाव ) किंवा काव्य ( म्हणजे रमणीयार्थप्रतिपादक शब्द किंवा रसात्मक वाक्य ) म्हणतात, तसल्या स्वरूपाचें सर्व मराठी वाङ्मय ( म्हणजे संतवाङ्मय ) नाही. या विधानांतील जोर ' सर्व ' शब्दावर आहे काय ? तसें असेल तर ' सर्व ' संस्कृत वाङ्मय तरी या स्वरूपांत बसेल अशी ग्वाही डॉक्टरसाहेब देऊं शकतील काय ? संतकवि आपल्या सर्वच लिखाणाला कवित्व म्हणतात, काय ? व असले तरी हें त्यांचें म्हणणें डॉ. वाटवे यांनी कोणकोणत्या युक्तिवादांनी खोडून काढलें आहे ? जर ' संत वाङ्मय लिहिणारांची वृत्ति अकाव्य वाङ्मयानुकूल आहे म्हणून तें अकाव्य आहे' आणि जर 'कवित्वाची कसोटी त्यांच्या मतें गौणपणाची आहे.' तर ही गौणपणाचीच कसोटी लावून डॉ. मजकुरांनी प्रतिभेचें देणें लाभलेले तीनचार संतकवि सोडून व एकनाथप्रभृतींचीं कांही काव्यें व इतर कांही स्थळें सोडून त्यांची दृष्टि वस्तुनिष्ठ असल्यामुळे त्यांनी अकाव्य निर्माण केलें हें सिद्ध करण्याचा एवढा आटापिटा तरी कां करावा? त्यांनी उपस्थित केलेला प्रत्येक मुद्दा अव्याप्ति व अतिव्याप्ति या दोषांनी इतका डागळलेला आहे की त्यांतून त्यांना काढावयाचा निष्कर्ष देखील तितकाच आभासमूलक उमटला तर त्यांत नवल नाहीं. हा व्यापार कशासाठी तर मराठी संतवाङ्मयाला ' काव्य ' म्हणतांना तसें म्हणणाराने विशेष दक्षता घ्यावी म्हणून ! संतवाङ्मयाला ' काव्य ' म्हणणाऱ्यांपैकी पहिले खुद्द

संतच होत. रूढ कल्पनेपेक्षा निराळी रचना करणारे कवि अशा घटनेचें समर्थन करून आपले काव्यविषयक विचार काव्यामध्येच प्रकट करीत असतात. संतकवींनी तसेंच केलें आहे. जणू कांही भावी संस्कृत-साहित्य-शास्त्रज्ञ आपलें कांव्य नवीशुनी कसोटी लावून 'अकाव्य' ठरवितील हें क्रान्तदर्शन संतकवींना स्वकालींच झालें होतें! लौकिक काव्याची कसोटी त्यांनी गौणपणाची ठरविली; परंतु

वाचें बरवें कवित्व
कवित्वीं बरवें रसिकत्व
रसिकत्वींहि परतत्त्व-
स्पर्श जैसा।

ही उच्च कवित्वाची व रसिकत्वाची कसोटी त्यांनी ठिकठिकाणीं आधुनिकांच्या उपयोगासाठी मांडूनच ठेवली नाही काय? त्यांनीं रांगोळ्या घालून, पाट मांडून रससोयहि करून ठेवली परंतु परतत्त्वस्पर्श होतांच कांहींच्या दृष्टिकोणांतून रस हा नीरस होतो-काव्य हें अकाव्य ठरतें-याला त्यांचा तरी काय उपाय?

डॉ. वाटवे हे संतकाव्यांतील शृंगाराच्या माथां पाय ठेवणाऱ्या शांतरसाचा व भक्तिरसाचा आस्वाद घेण्यासाठी अनधिकारी आहेत असें कुणीहि म्हणणार नाही. तसेंच 'येथ शांतुचि अभिनवैल' किंवा 'हे भक्तिरसीची त्रिपथा', त्यांना अगम्य आहे असेंहि नाही. पण संतांना कवि म्हणतांच संस्कृत साहित्यशास्त्र जीर्ण ठरतें, शृंगारादि 'लौकिक' रसांचें महत्त्व कमी होतें, त्या जीर्ण शास्त्राला संतकवींनी दिलेला उजळा डोळे दिपवून टाकतो व तुलना करू लागतांच 'गीर्वाणवाणीषु विशिष्टबुद्धि' असलेले लोक 'भाषांतरलोलुप' होऊं लागतात. पण त्यांची अशी द्विविधा निष्ठा डळमळूं लागतांच स्वभावसिद्ध अभिरुचीप्रमाणे 'तें आमचें संस्कृत साहित्य' व 'तें काव्य हेंच काय तें खरें साहित्य व काव्य' असा अभिनिवेश उत्पन्न होतो. अभिरुचि देशकालानुसार बदलली पाहिजे. परंतु संतकवि एखाद्याची अभिरुची बदलण्याला असमर्थ ठरले तर साहित्य'शास्त्र'कारांनी त्यांचें असें 'असमर्थ'त्व दाखवावें. सूर्यप्रकाशाला अंधार म्हणूं नये. अलौकिक अतएव श्रेष्ठ काव्यालाच अकाव्य म्हणूं नये. कित्येक वेळीं आत्मनिष्ठ नसलेलें काव्यहि श्रेष्ठ होऊं शकतें परंतु शास्त्रकारानें आत्मनिष्ठा सोडून दिली नाहीं तर त्याचे सिद्धान्त हे एकदेशी व स्वयंकेंद्रित बनतात. वस्तुनिष्ठता हा टीकावाङ्मयाचा प्राणच समजला पाहिजे.

मराठी संतकवींनी श्रेष्ठ काव्यरचना तर केलीच पण ठिकठिकाणीं आपल्या वेगळ्या काव्यरचनेची वेगळी कसोटीहि सांगितली. परतत्त्वस्पर्शासाठी आसुसलेल्या रसिकांनी त्यांच्या काव्यकृतींचा आजवर आस्वाद घेतला-घेऊन राहिले आहेत. अशा काव्याला नुसतें अकाव्य म्हटल्याने तें अकाव्य ठरत नाही. आजवर अनेकांनी तसें म्हटलें पण त्यांनाहि त्यांतील बहुतांश आस्वाद्य व काव्यरूपच वाटला. आता त्याच मुद्यांच्या शिळ्या कढीला नवा ऊत आणून कांहीच लभ्यांश नाही. डॉ. वाटवे हे आधुनिक मराठीचें साहित्यशास्त्र रचण्यासाठी बद्धपरिकर झालेले एक नामवंत प्रबंधकार आहेत. शिवाय ते संस्कृत व मराठी या दोन्ही विषयांतील एक अधिकारी प्राध्यापक समजले जातात. त्यांच्यासारख्यांच्या शास्त्रीय परिभाषेंतील लेखनाला त्यांच्या विद्यार्थ्यांच्या व सर्वसामान्य वाचकांच्या दृष्टीने एकप्रकारची प्रतिष्ठा आलेली असते. असल्या प्रतिष्ठेचा दुरुपयोग अशाप्रकारें अज्ञजनांचा बुद्धिभेद करण्यांत होऊं नये, असेंच कोणीहि

इच्छील. अनेकवार चर्चिले गेलेले विषयहि पुनः मांडून नवविचारांना चालना देणारे लेख 'एकनाथ–दर्शनां'त अंतर्भूत करून संपादकांनी हें दर्शन विविध करण्याचा यत्न केला आहे.

एकनाथी वाङ्‌मयावरील विचारांना चालना देणारा हा लेखसंग्रह संपादित व उपलब्ध करून देण्याबद्दल श्री एकनाथ संशोधन मंदिराचे चिटणीस श्री. न. शे. पोहनेरकर हे अभिनंदनास पात्र आहेत.

—माधव गोपाळ देशमुख.

विरलेल्या गारा [लेखक: न. शे. पोहोनेरकर, प्रकाशक–जोशी ब्रदर्स, गौळी गुडा–हैद्राबाद, दक्षिण. मूल्य १॥ रुपया.]

साहित्यक्षेत्रांतील एक निष्ठावान कार्यकर्ते, शाहीर व मराठी वाङ्‌मयाचे साक्षेपी अभ्यासक या नात्याने श्री. पोहोनेरकर सुपरिचित आहेत. 'नागशाही' हा त्यांचा काव्यसंग्रह व त्यांचे कांही पोवाडे बऱ्याच दिवसांपूर्वी प्रकाशित झालेले असले तरी गद्यलेख म्हणून या पुस्तकाच्या रूपाने ते प्रथमच वाचकांपुढे येत आहेत. परळी, बीदर आणि हैद्राबाद येथील आपल्या वास्तव्यांत लेखकाला ज्यांच्या जीवनाचा जवळून परिचय घडला अशांपैकी "निवडक पंधरा जणांच्या व्यक्तिरेखा, या पुस्तकांत अगदी जिव्हाळ्याने" रेखाटल्या आहेत. स्वतः लेखकाला आजवर जीवनाच्या विविध क्षेत्रांत भ्रमण करावें लागलें आहे नि आपल्या या विविध जीवनांतील अनुभव त्याने अत्यंत डोळसपणें टिपून घेतले आहेत, असें या व्यक्तिरेखांवरून वाटतें. या साऱ्या व्यक्तींचें जीवन मराठवाड्याच्या मुशींत ढाळलेलें असल्यामुळें साहजिकच तेथील विशिष्ट राजकीय व सामाजिक जीवनांचे कमीअधिक संस्कार त्यांवर झालेले दिसून येतात. तसेंच यांतील बहुतेक व्यक्ति जुन्या पिढींतील व परंपरेंतील आहेत व त्यांची निवड करतांना लेखकाने वरेंच वैचित्र्यहि दाखविलें आहे. या कारणाने या व्यक्तिरेखांच्या द्वारें, एका मर्यादेपर्यंत जुन्या पिढींतील मराठवाड्याचें सामाजिक जीवन साकार झाल्यासारखें वाटतें. व्यक्ति या दृष्टीने यांतील बहुतेक जणांत कांहीतरी डोळ्यांत भरण्याजोगें वैशिष्ट्य आहे. कुणी त्यागांत सर्वस्व घालविणारा आहे, तर कुणी भोगांत कफल्लक झालेला आहे; कुणी कलेचा अभिमानी आहे; तर कुणी आपल्या वैभवाचा. पण प्रत्येकाच्या जीवनाला एक विशिष्ट पीळ भरलेला आहे नि त्यामुळे त्यांचें जीवन कणखर, चिवट झालेलें आहे. त्या त्या व्यक्तिरेखेंतील हा पीळ, हा बाण, व त्या त्या व्यक्तीचें जीवनसूत्र लेखकाने मार्मिकपणें हेरलेलें दिसून येते.

मंत्रपठनांत काशीकरांना जिंकून त्यांची कंठी आग्रहाने स्वीकारणारे व पुनः घरीं बोलावून दक्षिणेसह ती परत करणारे दादाभट; परळीकरांचा शंकराचार्यांपुढे अपमान न व्हावा म्हणून आजारी अवस्थेंत निजल्या अंथरुणावरूनच, आपल्या देहाची पर्वा न करतां खड्या सुरांत मंत्रपाठ करणारे वेदोनारायण; पार्पी उस्मान इंजिनिअरच्या श्रीमुखांत भडकावणारी बालेघाटी बहादरीण, मरी मुकदम; रात्रभर 'नागा दिगुराचु' म्हणून सर्पस्तोत्र गाणारा शाळेचा राखणदार कसेयल्लप्पा व कधी कुणाच्या खातरेंत नसलेला पण गणपतीची पालखी ध्वजाशिवाय काढण्याची गुंडाची सूचना धुडकावून गोळीला बळी पडलेला माधव, या सामान्यांतीलहि असामान्यत्व दाखविणाऱ्या व्यक्तिरेखा लेखकाने मोजक्या घटनांच्या बळावर प्रभावीपणें चितारल्या आहेत. 'आमचे देसाई' ही व्यक्तिरेखा, अनंतराव

देसाई या बीदर जिल्ह्यांतील एका खाजगी शाळेच्या आश्रयदात्याचें व चालकाचें उदात्त जीवन दाखविणारी आहे. लेखकानें अधिकच आत्मीयतेने व समरसतेने ही व्यक्तिरेखा निर्माण केल्यामुळे ती मनाला चटका लावून सोडते. गुरुलिंगस्वामी, वेडी भागुबाई व तुळशीराम या तीन व्यक्तिरेखा मात्र लेखकाने कशासाठी निर्माण केल्या आहेत, तें कळत नाही. त्यांच्याद्वारें त्याला, तऱ्हेवाईक, वेडसर अशा व्यक्तींच्या मनोभावांचें चित्रण करावयाचें आहे कीं अद्‌भुततेचें दर्शन घडवावयाचें आहे तें उमगत नाही. अद्‌भुताचा उपयोग करून या व्यक्तींना दैवी स्वरूप देण्याचा प्रयत्न लेखकाने केला आहे नि म्हणून इतर व्यक्तींइतकें त्यांचें चित्रण मनोज्ञ वठलें नाही, कारण तें संभाव्यच वाटत नाही. ऐकीव व प्रत्यक्ष अनुभवलेल्या अशा घटनांची आपल्या कल्पनाशक्तीच्या बळावर संगति लावून एक परिणामकारक व्यक्तिमत्व साकार करण्याचें कसब 'अप्पा तुळशी', 'दत्तोपंत मोहरील,' 'गोलंदाजाची अवलाद' यांसारख्या व्यक्तिरेखांत चांगलें दिसून येतें. प्रसंगाची निवड देखील अशी केलेली आहे की, विशेष उत्कटतेने निर्माण केलेले नसतांहि ते मनाची पकड घेण्यास समर्थ ठरतात आणि यथार्थ व्यक्तिवर्णनाचें कौशल्यहि लेखकांत असल्यामुळे प्रस्तुत पुस्तकांतील बहुतेक व्यक्तिरेखा दीर्घकाल स्मरणांत राहण्यासारख्या आहेत.

—भगवंत देशमुख.

राज्यशास्त्र [ लेखकः—वसंत मंजुनाथ सिरसीकर व सदाशिव मार्तंड गर्गे. प्रकाशक—सौ. सुधा सिरसीकर. सदाशिव, पुणें २. पृष्ठें ५००, मूल्य ८ रु. ]

'राज्यशास्त्र' हें पुस्तक पुणें येथील स. प. कॉलेजांतील राज्यशास्त्राचे प्राध्यापक श्री. व. मं. सिरसीकर व त्यांचे मित्र श्री. स. मा. गर्गे यांनी परिश्रमपूर्वक लिहिलें आहे. मराठी भाषेंत अशा प्रकारच्या शास्त्रीय ग्रंथांची उणीव आहे. नागपूर विद्यापीठानें पदवी परीक्षेपर्यंत मराठी माध्यम सुरू केलें आहे. लवकरच मुंबई, पुणें इत्यादि विद्यापीठांतहि मराठी भाषेचें माध्यम सुरू करावें लागेल. तेव्हा महाविद्यालयीन अभ्यासक्रमांत ज्या विषयांचा समावेश केला जातो त्या सर्व विषयांवरील पुस्तकें मराठींत निर्माण झालीं पाहिजेत अशा एका विषयावरील पुस्तक लिहून विद्यार्थ्यांची अडचण अंशतः दूर केल्याबद्दल लेखकद्वय अभिनंदनास पात्र आहे.

शास्त्रीय विषयावरील कोणतेंहि पुस्तक स्वतंत्रपणें लिहिलें जाऊं शकत नाही. अनेक पुस्तकांचा आधार घ्यावा लागतो, मागे होऊन गेलेल्या विचारवंतांचे विचार जमेला धरावे लागतात व प्रसंगीं विद्वानांचीं वचनें उद्‌धृत करावीं लागतात. हें सर्व आम्हीं केलें आहे, अशी कबुली लेखकद्वयांने आपल्या निवेदनांत दिली आहे, हें ठीकच आहे. परंतु पुस्तकांतील कांही प्रकरणें ई. आशीर्वादम् यांच्या पोलिटिकल् थिअरी व अनुपचंद कपूर यांच्या प्रिन्सिपल्स् ऑफ पोलिटिकल सायन्स, या पुस्तकांतलि तद्विषयक प्रकरणांचीं बऱ्याच अंशाने भाषांतरें असल्यासारखीं वाटतात. या लेखकांचें ऋण सदहू लेखकांनी व्यक्त केलें नाही. त्याप्रमाणेच कोणकोणत्या ग्रंथांचा आधार घेतला याची सूचिहि दिली नाही. असें करणें योग्य नाही असें वाटतें.

नागपूर विद्यापीठाच्या पदवीपरीक्षेसाठी 'राज्यशास्त्र' या विषयाचा जो अभ्यासक्रम आहे, त्याला अनुसरून हें पुस्तक लिहिलें आहे. ( मात्र तसा उल्लेख लेखकद्वयाने कुठेहि

केला नाही, याचें आश्चर्य वाटतें ! ) अद्याप या विषयाची परिभाषा निश्चित झाली नाही. त्यामुळे प्रत्येक कॉलेजांत तेथील प्राध्यापकाच्या मतानुसार परिभाषा वापरली जाते. अशा वेळीं ग्रंथकर्त्यांवर योग्य परिभाषा वापरण्याची जबाबदारी येऊन पडते. त्या दृष्टीने सदर लेखकांनी फारसे परिश्रम केल्यासारखें दिसत नाही. कांही ठिकाणीं तर प्रचलित अर्थवाही शब्द काढून टाकून बोजड व अपरिचित शब्द वापरले आहेत. उदा. ' करार ' च्या ऐवजी ' प्रसंविदा ', ' सार्वत्रिक मनोदय ' च्या ऐवजी ' सामाजिक ईहा ', ' सरकार ' च्या ऐवजी ' शासन-संस्था ' इ. त्याप्रमाणेच कांही इंग्रजी शब्दांचे पर्याय योग्य रीतीने बनवले नाहीत. उदा- Unitary साठी एकात्म, Federal साठीं संघराज्यात्मक, Law साठी विधिनियम, Equity साठी सामान्य बुद्धि इ. यांहून चांगले अर्थवाही शब्द वापरायला हवे होते. तसेंच Initiative, Referendum, व Recall या शब्दांसाठीं प्रतिशब्द तयारच केले नाहीत. याचा उल्लेख खुद्द लेखकांनी निवेदनांत केला आहे. परंतु निवेदनांत कबुली दिल्यामुळे लेखकांची जबाबदारी संपत नाही. राजसत्ता, हुकुमशाही, महाजनसत्ता, अल्पजनसत्ता इत्यादि शब्दहि पारिभाषिक मालिकेंत बसूं शकत नाहीत. राजतंत्र, व्यक्तितंत्र, शिष्टतंत्र, धनिकतंत्र इत्यादि शब्द अधिक योग्य झाले असते.

पुस्तकाची भाषा कांहीशी बोजड वाटते. सहज अर्थप्रवाही नाही. त्यामुळे विषय समजण्याला थोडेसे कष्ट होतात. त्याचप्रमाणे समाजवाद, साम्यवाद, गांधीवाद इत्यादिसंबंधी सविस्तर विवेचन पुस्तकांत असणें आवश्यक होतें. आणि पाश्चात्य लेखकांच्या ग्रंथांच्या आधारें असलें तरी भारतीय दृष्टिकोणांतून पुस्तक लिहितां आलें असतें.

असो. ज्या त्रुटि वर दाखविल्या आहेत त्या दूर करणें शक्य आहे. पुनर्मुद्रणाचा सुयोग आल्यास लेखकद्वय त्या संधीचा फायदा अवश्य घेईल असें वाटतें. श्री. न. वि. गाडगीळ यांची प्रस्तावना देण्याने पुस्तकाचें मूल्य वाढेल असें लेखकांना वाटलें असावें. पण तो हेतु साध्य झाल्यासारखा दिसत नाही. कारण प्रस्तावना सामान्य दर्जाची आहे.

—गो. मा. कुलकर्णी.

---

### अभिप्राय व परीक्षणें

महाराष्ट्र साहित्य-पत्रिकेकडे अभिप्रायार्थ आलेल्या अनेक पुस्तकांवरील अभिप्राय अजून द्यावयाचे आहेत याची आम्हांला जाणीव आहे. तज्ज्ञांकडून अभिप्राय लिहून घ्यावयाचे म्हणजे वेळ लागायचाच हें लेखकांनी व प्रकाशकांनी कृपा करून लक्षांत घ्यावें, अशी विनंती आहे. तथापि पुढील अंकापासून या बाबतींत आवश्यक ती सुधारणा झाल्याचें त्यांना आढळून येईल एवढेंच आश्वासन या ठिकाणीं देतों.

—संपादक.

---

अनुक्रमणिका

## विदर्भ साहित्य संमेलन

विदर्भ साहित्य संमेलनाचें १५ वें अधिवेशन अमरावती जवळील गुरुकुंज–मोझरी या प्रशांतरमणीय खेडेगावांत ता. १४ व १५ मार्च रोजीं अत्यंत यशस्वीपणें पार पडलें. मराठी भाषेचीं आणि साहित्याचीं संमेलनें खेड्यापाड्यांत भरविण्याची विदर्भ साहित्य संघाची ही कल्पना अभिनंदनीय आहे. मराठी साहित्य हें मूठभर सुशिक्षितांसाठी किंवा उच्चभ्रूंसाठी नाही, तें सर्वांच्यासाठी आहे, असलें पाहिजे, याची जाणीव साकार होऊं लागल्याचें हें प्रसादचिन्ह होय. मराठी भाषिकांच्या ज्या संख्याबलावर अवलंबून आम्ही सभासंमेलनांतून मराठी भाषेवरील आक्रमणाबद्दल, तिच्या संरक्षणाबद्दल व संयुक्त महाराष्ट्राबद्दल गर्जून भाषणें करतों तें संख्याबल खेड्यापाड्यांत पसरलेल्या बहुजनसमाजाचें होय. या प्रश्नांच्या अंतिम निर्णयप्रसंगीं या बहुजनसमाजालाच शरण जावें लागेल. या दृष्टीने त्यांच्याशीं जितका अधिक संपर्क वाढवितां येईल तितका तो वाढविला पाहिजे; त्यांना विश्वासांत घेऊन आपल्या कार्याची ओळख करून दिली पाहिजे; मराठी भाषेविषयी उत्कट प्रेम त्यांच्या अंतः–करणांत जागविलें पाहिजे, त्यांना ज्ञानसंपन्न बनविणारें आणि त्यांची अभिरुचि वाढविणारें साहित्य निर्माण करून तें त्यांच्यापर्यंत पोचविलें पाहिजे. सुशिक्षित–अशिक्षित, नागर आणि जानपद जनता यांच्यांत सांधेजोड घडून आल्याशिवाय मराठी भाषेचे प्रश्न सुटणार नाहींत हें आमच्या कार्यकर्त्यांच्या जितकें लक्ष्यांत यायला पाहिजे तितकें अजून आलें नाही, ही दुर्दैवाची गोष्ट आहे. म्हणूनच, साहित्याने लोकाभिमुख होण्यापेक्षा लोकांनी साहित्याभिमुख व्हावें, खेड्यांतल्या या जनतेपासून आम्हां साहित्यिकांना शिकण्यासारखें तें काय आहे— अशा प्रकारची अहंकाराची भाषा ऐकूं येते. त्या अहंकाराच्या आहारीं न जातां संपूर्ण मराठी–भाषी जनता एकात्म करून सोडण्याच्या दृष्टीने विदर्भ साहित्य संघाच्या कार्यकर्त्यांनी आपलें संमेलन खेड्यांत नेलें हें फार चांगलें केलें. त्यांच्या या क्रांतिकारक उपक्रमाबद्दल आम्ही त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों.

## संत तुकडोजींचें हृदय

आपल्या ओजस्वी वाणीने हजारों श्रोत्यांच्या अंतःकरणांत सद्भावनांचें बीज पेरणारे विधायक कार्यकर्ते आणि साहित्यिक राष्ट्रसंत श्री तुकडोजी महाराज यांनीं या संमेलनाचें उद्घाटन केलें. त्या प्रसंगीं भाषण करितांना त्यांनी आपलें अंतःकरणच उकलून दाखविलें असें म्हणायला हरकत नाही. तुकडोजी महाराज हे बहुजनसमाजाचे वाचस्पति आहेत. साहित्यिकांपासून जनता कोणत्या गोष्टीची अपेक्षा करते हें त्यांच्या उद्घाटनाच्या भाषणावरून फार चांगल्या रीतीने लक्षांत येतें. ते म्हणतात :

"समाजाच्या जीवनांत हवी ती क्रांति घडवून आणण्याचें सामर्थ्य साहित्यिक, उपदेशक व अध्यापक लोकांत आहे. त्यांची वाणी किंवा लेखणी मनांत आणील तर हलाहल विष ओतून समाजाचा सत्यानाश करूं शकेल आणि योग्य मार्गाने पाऊल टाकील तर अमृत संजीवनीप्रमाणे स्मशानांत सुद्धा नंदनवन निर्माण करूं लागेल. एके काळीं साहित्यिकांनी गोट्यांत

मुद्धा देवाची स्थापना केली आणि सर्व समाजाला त्यांच्या भजनीं लावलें; परंतु आज आपणांस गोटे बनलेल्या मानवांत देवत्व जागवावयाचें आहे; हिरेमोती आणि फुलें—तारका यांत सौंदर्य पाहणाऱ्या दृष्टीला दुःखितांच्या अश्रूंत व श्रमिकांच्या घर्मबिंदूंत वसत असलेल्या सौंदर्याची चमक दाखवायची आहे. गाद्यांगिरद्यांवर लोळून करुणरसाचीं कवनें आळवणारांना ही गोष्ट पटवून द्यावयाची आहे की, दुःखितांचा आर्त टाहो ऐकून धावून जाणारा व आपल्या सेवेने त्यांच्या दुःखाश्रूंच्या जागीं आनंदाश्रु निर्माण करणारा सहृदय सेवक हाच खराखुरा साहित्यिक आहे.

हजारो माणसांनी श्रम करून उपाशी मरावें, त्यांच्या श्रमावर मूठभर लोकांनी भरमसाट मुनाफा मिळवावा आणि त्या मुनाफेखोरांपासून शिकारीचा वाटा मिळतो म्हणून कित्येक लोकांनी कष्ट करणाऱ्या लोकांची ही गळचेपी अबाधित चालूं ठेवावी आणि त्यांची तरफदारी करीत जावी, ही गोष्ट सहृदयतेला किंवा मानवतेला धरून असूं शकत नाही. श्रमणाऱ्यांना हक्कांची व ऐतखाऊंना कर्तव्याची जाणीव करून देणें हें साहित्यिकांचें मुख्य कर्तव्य आहे. स्वतः कष्ट करणाऱ्या लोकांची आम्ही किती गळचेपी करीत आहोंत, याची जाणीव फुकटखाऊ लोकांच्या हृदयांत निर्माण करणें हें अत्यंत महत्त्वाचें कार्य साहित्यिकांनीं केलें पाहिजे."

## शांत रसाचें व मराठा विवेकाचें विवेचन

मोझरी येथील संमेलनाचे अध्यक्ष डॉ. शं. दा. पेंडसे यांचें भाषण 'साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षाने संमेलनप्रसंगीं वाङ्मयविषयक भाषण करण्याची जी प्रथा तिला अनुसरून' झालें. खेड्यांत राहणाऱ्या लोकांना संतवाङ्मयाचा अधिक परिचय असल्यामुळे 'संतांनी जें सांगितलें त्याचें यथार्थ स्वरूप' डॉ. पेंडसे यांनी आपल्या भाषणांत विशद केलें. संतवाङ्मयाचें वैशिष्ट्य ज्यांत साठलेलें आहे अशा शांत रससंबंधी मार्मिक विवेचन करून ज्ञानेश्वरांच्या 'मऱ्हाठा बोला'चें त्यांनी विशेष विस्ताराने प्रतिपादन केलें. या प्रतिपादनाच्या ओघांत 'ललितवाङ्मय आणि क्रांति' 'नीति आणि कलात्मक वाङ्मय' इत्यादि विषयांविषयी त्यांनी आपले विचार व्यक्त केले. संयुक्त महाराष्ट्राचा पवित्र संकल्प उच्चारतांना ते म्हणाले :

" संयुक्त महाराष्ट्र हा एक पवित्र सत्यसंकल्प आहे. हिंदी किंवा गुजराथी बांधवांच्या द्वेषाचा त्याला संपर्कहि होतां कामा नये. त्यांच्या व आमच्या राष्ट्रीय व सांस्कृतिक ऐक्याचा भंग होऊं न देतां हा संकल्प आपणांस सिद्धीस न्यावयाचा आहे. तो सिद्धीला जाईपर्यंत साहित्यसंमेलनाच्या व्यासपीठावरून त्यांचा अखंड उच्चार आम्ही करीत राहूं. दिल्लीश्वर कांहीहि म्हणाले तरी सत्यसंकल्पाचा दाता जगदीश्वर हा संकल्प सिद्धीला नेईल यांत शंका कसली ! उलट आपण मागतों एक डोळा तर देव देतो दोन डोळे असा प्रकार या बाबतींत होण्याचा बराच संभव आहे. आर्थिक दास्य नष्ट करणारा साम्यवाद आणि भाषावार प्रांतरचना या दोन्ही गोष्टी एकदमच अस्तित्वांत याव्या असा ईश्वरी संकेत दिसतो. कांही लोकांचे आर्थिक हितसंबंध हा भाषावार प्रांतरचनेच्या मार्गातील एक मोठाच अडथळा आहे. या आर्थिक दास्यांतून लोकांना मुक्त करणारा साम्यवादाचा यमधर्म दक्षिणेकडून हळूहळू उत्तरेकडे येत आहे. ज्यावेळीं संपूर्ण दक्षिण तो ग्रासील त्याचवेळीं भाषावार प्रांतरचना होऊन दाक्षिणात्य भाषांचें दैन्यहि संपेल. तसें झालें तरीहि ती इष्टापत्तीच आहे. "

संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेचें जें हें राजकीय भविष्य डॉ. पेंडसे यांनी वर्तविलें तें अनेकांना चिंत्य वाटेल !

प्रा. भवानीशंकर श्रीधर पंडित

नवीन वर्षासाठी विदर्भ साहित्य संघाचे अध्यक्ष म्हणून प्रा. भवानीशंकर श्रीधर पंडित यांची निवड झालेली आहे. आम्ही त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करितों. प्रा. पंडित हे महाराष्ट्राचे एक नामवंत कवि आहेत. ' पिचलेला पावा ' व ' उन्मेष आणि उद्रेक ' हे त्यांचे काव्यसंग्रह महाराष्ट्रांत मान्यता पावले आहेत. लहान मुलांसाठी त्यांनी लिहिलेल्या कवितांचे अनेक संग्रह आतापर्यंत प्रसिद्ध झाले. ' बीजेचा कोर ' 'चवथीचा चांद' ' अष्टमीचा चंद्र ' व ' पौर्णिमेचा चांदणें ' यांतील कवितांनी महाराष्ट्रांतील लहान मुलांच्या अंतःकरणाची पकड घेतलेली दिसून येईल. कविप्रमाणेच ते एक श्रेष्ठ दर्जाचे काव्यविवेचकहि आहेत. ' सत्यकथें'तून इंग्रजी राजवटींतील मराठी कवितेवर त्यांनी लिहिलेल्या लेखमालेचा कुणाला विसर पडणें शक्य आहे ! हे सर्व लेख परिष्कृत स्वरूपांत ' आधुनिक मराठी कविता ' म्हणून ग्रंथरूपाने नुकतेच प्रसिद्ध झालेले आहेत. त्यांनी लिहिलेल्या ' सवडीच्या क्षणांत ' त्यांच्या खुमासदार ललित लेखनशैलीचा प्रत्यय येतो. प्रा. पंडितांना काव्यगायनाचें अंग मुळीच नाही, म्हणून त्या क्षेत्रांत ते अयशस्वी होतात. पण वक्तृत्वाचा अमोल गुण त्यांच्याजवळ आहे. त्यामुळे त्यांचीं भाषणें परिणामकारक होतात. जुन्या काव्याचाहि त्यांचा व्यासंग वाखाणण्यासारखा आहे. असा हा बहुगुणी रसिक विद्वान आपल्या अध्यक्षपदीं निवडून दिल्याबद्दल वि. सा. संघाच्या सभासदांचें अभिनंदन करणें अवश्य आहे. प्रा. पंडितांच्या कारकीर्दीत वि. सा. संघाचें कार्य अधिकाधिक प्रसार पावेल यांत शंका नाही. आम्ही त्यांना सुयश चिंतितों.

ज्ञानदेवांची अकाली समाधि

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या १०१ व्या अंकांत महाराष्ट्राचे विचारवंत लेखक प्रा. द. के. केळकर यांचा 'ज्ञानदेवाची अकाली समाधि' या विषयावर एक लेख छापला आहे त्यावर आक्षेप घेणाऱ्या व्यक्तींचे लेख व त्या आक्षेपांना उत्तर म्हणून प्रा. केळकर यांचा समारोपाचा लेख नंतरच्या दोन अंकांत दिले आहेत. प्रस्तुत विषयासंबंधी प्रा. केळकर यांनी जे मुद्दे उपस्थित केले आहेत ते इतके स्पष्ट आहेत की त्याविषयी कांहीहि शंका राहूं नये. त्यावरील कांही उत्तरांचा रोख पाहिला म्हणजे फार निराशा होते. मूळ प्रश्नाला सरळ उत्तर देण्याऐवजी आगंतुक मुद्दे कुरवाळीत बसण्यांतच त्यांनी धन्यता मानली आहे. सरळ उत्तर दिल्यास ज्ञानेश्वरांच्या प्रतिष्ठेला कांही कमीपणा येईल अशी भीति तर या लेखकांना वाटली नसेल ना ! त्यांतल्या त्यांत 'ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरी रचली ती नाथपंथाच्या तत्त्वप्रसारार्थ व अद्वैतमत प्रतिष्ठापनेसाठीच रचली असल्याने तिच्या द्वारा गीतेचा प्रवृत्तिपर संदेश जनतेस देण्याचा त्यांचा जसा हेतुच नव्हता, तद्वतच ज्ञानेश्वरीच्या अखेरीस आलेल्या रामदेवरावाच्या एकुलत्या एका उल्लेखावरून तो राजापर्यंत पोचविण्याचाहि त्याचा उद्देश नसल्यामुळे, गीतेचा संदेश जनतेस व राजास पोचविण्याचें कर्तव्य बजावल्याबद्दल प्रो. केळकरांनी ज्ञानेश्वरांना दिलेले धन्यवाद निखालस अस्थानी आहेत." हें प्रा. पंगु यांनी दिलेलें उत्तर त्यांच्या दृष्टीने सरळ आहे. योगसामर्थ्यासंबंधींचेंहि उत्तर तितकेंच स्पष्ट आहे. पण त्याचा उच्चार करण्याचें धैर्य कुणी दाखवलेलें नाही. असो. पृष्ठसंख्येच्या मर्यादेमुळे साहित्यपत्रिकेपुरती प्रस्तुत चर्चा आता बंद करण्यासिवाय गत्यंतर नाही.

---

# महाराष्ट्र–साहित्य–परिषद्

## १९५२–५३– चें इतिवृत्त

**सभासद–संख्या.** वर्षअखेर सभासदांची संख्या एकूण १५४६ आहे. त्यांपैकी ११०० साधारण असून २ उपकर्ते, ४ आश्रयदाते, ९ साहाय्यक, ३० हितचिंतक व ४०१ तहहयात अशी वर्गवारी आहे.

**आर्थिक स्थिति.** सोबत आयव्ययपत्रक व ताळेबंद अशीं दोन पत्रकें जोडलीं आहेत. त्यांवरून परिषदेच्या आर्थिक स्थितीची कल्पना येईल.

**स्मृतिदिन.** ज्ञानकोशकार कै. श्रीधर व्यंकटेश केतकर यांच्या स्मृतिदिनानिमित्त गुरुवार दि. १० एप्रिलला सकाळीं त्यांच्या समाधीला पुष्पांजलि अर्पिण्यांत आली. या प्रसंगीं कै. केतकरांच्या स्मृतिस्थळीं प्रा. माटे, प्रा. मंगळूळकर, प्रा. निरंतर, डॉ. वाटवे, प्रा. वा. दा. गोखले, प्रा. क्षीरसागर, डॉ. द. न. गोखले, इत्यादि मंडळी उपस्थित होती. संध्याकाळीं डॉ. द. न. गोखले यांचें 'ज्ञानकोशकारांच्या जीवनाचें रहस्य' या विषयावर उद्बोधक व्याख्यान झालें. कै. वा. म. जोशी यांचा स्मृतिदिन प्रतिवर्षाप्रमाणे दि. २० जुलैला पाळला गेला. या दिवशीं सुप्रसिद्ध कन्नड व मराठी कवि आणि समीक्षक प्रा. द. रा. बेंद्रे यांचें 'नाट्यकलाचातुर्य' अथवा ''नाट्यसृष्टिसौंदर्याच्या चार बाजू' या विषयावर सुश्राव्य व्याख्यान झालें. रविवार दि. ९ नोव्हेंबर रोजीं केशवसुतांच्या स्मृतिदिनानिमित्त प्रा. रा. श्री. जोग यांचें 'केशवसुत आणि नवकाव्य' या विषयावर व्याख्यान झालें. कै. माधवराव पटवर्धनांच्या स्मृतिदिनीं (२९ नोव्हेंबर) प्रा. अनंत काणेकर यांनी 'ब्रह्मानंद-सहोदर' या विषयावर व्याख्यान दिलें.

**व्याख्यानें, चर्चा.** दिल्लीला झालेल्या गांधर्व महाविद्यालयाच्या सुवर्णमहोत्सवास प्रा. रा. शं. वाळिंबे गेले होते. त्यांनी शनिवार दि. २४ मे रोजीं सकाळीं महोत्सवाचा वृत्तांत निमंत्रित मंडळीपुढे निवेदन केला. गुरुवार दि. २९ मे रोजीं प्रा. गंगाधर गाडगीळ यांचें 'साहित्यांतील रत्नपरीक्षा' या विषयावर 'चिपळूणकर–सभागृहां'त व्याख्यान झालें. 'भारतीय नाट्यकला' या विषयावर श्री. वा. ज. गोस्वामी यांनी दि. २१।२२ जून रोजीं सप्रयोग उद्बोधक व्याख्यानें दिलीं. शाहिरी वाङ्मयाचे अभ्यासक श्री. म. ना. सहस्रबुद्धे यांचें दि. २९ जुलैला 'आध्यात्मिक शाहिरी' या विषयावर व्याख्यान झालें. गुरुवार दि. ११ डिसेंबर रोजीं प्रा. रा. शं. वाळिंबे यांचें 'बालकवींची वेहोषी' या विषयावर प्रा. अरविंद मंगरूळकर यांच्या अध्यक्षतेने व्याख्यान झालें. या वेळीं श्री. के. नारायण काळे यांनी कांहीं प्रश्न विचारल्यावरून चर्चाहि झाली. 'ऑथेल्लो' नाटकावर प्रा. ना. सी. फडके यांचा 'हंस'च्या दिवाळी अंकांतील लेख बराच गाजला होता. त्या लेखांत प्रा. फडके यांनी मांडलेल्या कांहीं नवीन मुद्द्यांना उत्तरें देण्यासाठी प्रा. रा. शं. वाळिंबे यांनी दि. २१ व २२ जानेवारी रोजीं 'ऑथेल्लोच्या ट्रॅजेडीचें रहस्य' या विषयावर दोन व्याख्यानें दिलीं. या व्याख्यानांना डॉ. वाटवे हे अध्यक्ष होते.

